( मकरंदाच्या आठव्या वर्षाची भेट ).

# कुसुमवसंत.



[ प्रोज नाटक ].

लेखक.

कृ. गो. केळकर.

[ प्रथमावृत्ती. ]



भाद्रपद शके १८२९

" मोदवृत्त छा० छा० "

किंमत ०१२ आणे.

## नाटकांतील पात्रें.

पुरुष.

यशवंतराव— पैसा मिळवायला दूरदेशीं गेलेला एक गरीब गृहस्थ.

जाधवराव— एका जहाजावरील मुख्य कप्तान.

मदन— जाधवरावचा वडील मुलगा.

गुलाब— जाधवरावचा लहान मुलगा.

वसंत— यशवंतरावचा मुलगा.

रणधीरराव— कांचनपुरांतील एक सुखवस्तु गृहस्थ.

दौलतराव— जहाजावरील जाधवरावच्या हाताखालील अंमलादार.

धोंडीबा— कांचनपुरांती एक गरीब शेतकरी.

स्त्रिया.

मालती — यशवंतरावची मुलगी.

कुसुम— जाधवरावची मानलेली मुलगी.

मनोरमा— यशवंतरावची बायको.

नलिनी— कांचनपुरांतील एका निर्धन शेतकऱ्याची मुलगी.

---

ह्या लेखकाची पुस्तकें.

| | |
|---|---|
| शांता कादंबरी .... .... .... .... | १८६ |
| कुसुमवसंत ........ .... .... .... | ८१२ |

हायहाय ! किती कठिण, किती निर्दय मनुष्यमात्राचें मन असतें तरी !

जाधव०— यशवंतराव, असें घाबरण्याचें कांहीं कारण नाहीं. आपल्याला जाधवरावांची भेट पाहिजे होती ना ! मग मीच तो जाधवराव. आपलें काय ह्मणणं आहे ?

यश०— कोण ? ह्या जहाजावरील कप्तान जाधवराव ते तुह्मीच कां ? ठीक आहे तर. जाधवराव, ह्याठिकाणीं आपणां दोघांपरतां तिसरें मनुष्य कुणी नसेल तर माझ्या मनांतून तुह्मांला कांहीं सांगावयाचें आहे.

जाधव०— छे, इथें कुणीही परक्या मनुष्यानें येऊं नये अशी मीं पूर्वीच व्यवस्था केली आहे. काय आपणाला मला सांगावयाचें असेल तें खुशाल मन मोकळें करून सांगा. माझें लक्ष्य आहे. पण हें काय यशवंतराव. ( त्यास हालवून ) अहो यशवंतराव ! यांना ही पुन्हां घेरी आली वाटतें.

यश०— ( सावध होऊन ) जाधवराव, माझी आतां अक्षयींचीच बेशुद्ध होण्याची वेळ जवळ आली आहे; याकरितां मला काय सांगावयाचें तें मी अगदीं थोडक्यांत सांगतों. माझी एक इच्छा— आणि ती आतां शेवटचीच इच्छा आहे. जाधवराव, माझा तुमच्यावर विश्वास फार. मी अगदीं परका मनुष्य, अगदीं गरीब, अशिक्षित असा असतांना हें तुमच्या माझ्यांतलें जमीनअस्मानूचें अंतर यत्किंचितूही मनांत न आणतां तुह्मी मला आपल्या सख्ख्या नातलगाप्रमाणें वागिवलंत. थोड्या काळांतच आपलीं दोघांचीं मनें एक होऊन आपण एकमेकांना अगदीं जीवींचे जिवलग झालों आणि हें आपलें सख्य बरेच दिवसपर्यंत राहील. त्यांत कधींही अंतर पडणार नाहीं, अशी मीं फार आशाही

केली पण व्यर्थ, तें सर्व व्यर्थ गेलें. क्षणभर तुमच्यावांचून मी अलग रहात नसे व तुह्मीही मला नेहमीं प्राणापलीकडे मानीत होतां पण दुर्दैवानें आपला दोघांचा 'वियोग'– कायमचा वियोग होण्याची वेळ लवकरच आणली, त्याला निरुपाय आहे. ( जाधवरावाचा हात धरून ) जाधवराव, तुह्मी माझा विश्वासघात नाहींना करणार ?

जाध०– ( आलेले नेत्राश्रु पुसून शोकाकुल स्वरानें ) काय हें ! यशवंतराव, तुमचा विश्वासघात ! आणि तो मी करणार ! नको–नको ही कल्पना. केवळ मृत्यूचाच तो अभेद्य पाश–मानवी शक्तीच्या बाहेरचा ह्मणून इलाज नाहीं. नाहींतर तुह्माला काळाच्या दाढेंतून सुद्धां मीं ओढून आणला असता ! बोला. काय सांगावयाचें तें सांगून टाका. तुमच्या मनाची ही अगोदरच फार भयंकर स्थिति झाली आहे आणि त्यावर ह्या कुकल्पनेच्या तीव्र डागण्या आपल्या हातांनींच नका तुह्मी लावून घेऊं. बोला काय तें. फार काय, तुमच्याकरितां हा प्राणसुद्धां देण्याला मी तयार आहें. तुमच्याशीं विश्वासघातासारखें अधमपणाचें कृत्य करण्यापेक्षां तुमच्याबरोबरच हा भूलोक सोडून आलेलों काय वाईट !

यश०– ठीक आहे. सांगायचें ह्मणजे कांहीं फारसें नाहीं. पण त्याकरितां माझ्या आयुष्यांतील साधारण सर्वच गोष्टींचा मला उल्लेख केला पाहिजे. मीं आपलें सर्व आयुष्य, एक अगदीं अशिक्षित आडदांड गडी याप्रमाणें घालविलें. शिक्षणाचें व आमचें जरी अगदीं हाडवैर नव्हतें तरी त्याचे पक्के प्रतिस्पर्धी जे आळस, आडदांडपणा, मानी स्वभाव, उनाड लोकांची संगत व अंशतः आईबापांचे मुलावर असलेले फाजील लाड, यांची व आमची पक्की दोस्ती असल्यामुळें

त्याचा आमचा बहुतेक बेबनावच होता, पण त्यांमुळें होणारा लक्ष्मीदेवीचा कोप माझ्या वयाच्या सोळा वर्षेपर्यंत मला कळून आला नाहीं. माझ्या या अशा स्वभावामुळें माझ्या आईबापांना नेहमीं फार वाईट वाटे. होतां होतां आपल्या जवळील असलेली तुटपुंजी दौलत आपल्या एकुलत्या एक पुत्राच्या स्वाधीन करून त्यांनीं परलोकचा मार्ग धरला. झालें. तेथून आमच्या आयुष्याला निराळीच दिशा लागली. जाधवराव, तुम्हांला काय सांगूं, गोष्ट कांहीं तारीफ करण्यासारखी नव्हे, पण माझ्यासारख्या टोळभैरवाला अशी लावण्यमयी, सुशील, सद्गुणी, श्रीमंत बायको मिळेल असें माझ्या कधीं स्वप्नांत सुद्धां आलें नाहीं, पण अचानकपणें अलभ्य लाभ घडला असतां तो फार दिवसपर्यंत टिकत नसतो. हा सर्व जगाचा अनुभव माझ्याही प्रत्ययाला दुर्दैवानें आलाच. हायहाय ! ह्या सर्व सुखाला मी कायमचा अंतरणार हें मनांत येतांच क्षणोक्षणीं माझ्या काळजाचे तुकडे तुकडे उडत आहेत ! जाधवराव, खरोखर तुम्हाला—तुम्हालाच काय, पण कुणालाही माझ्यासारखें क्षणिक सौख्य भोगण्याचा प्रसंग न येवो !

जाध०— यशवंतराव, या जगांत सर्वांनाच सुखाचा सारखा वांटा कधींही मिळत नसतो. याकरितां प्रसंगविशेषीं आपल्याहून अधिक दुर्दैवी ज्यांची स्थिति, ज्यांचें आयुष्य म्हणजे निव्वळ शोचनीय, अशा अनेक हतभागी प्राण्यांच्या स्थितीचें चित्र आपल्या मनांत आणून आहे त्यांतच समाधान मानीत राहावें, यासारखा दुसरा श्रेयस्कर मार्ग नाहीं. पण तुम्हाला अशा रीतीनें जलपर्यटन करण्याचा प्रसंग येण्याला काय कारण ?

यश०— कारण— माझें दुर्दैव ! दुसरें कारण काय सांगूं. हतभागी, चांडाळ, अधम ह्मणून मला ती दुर्बुद्धि झाली. जाधवराव, केवल तुह्मला ह्मणूनच मीं ही . आपली लज्जास्पद स्थिति निर्लज्जपणानें वर्णन करीत आहें. माझी पत्नी चांगल्या श्रीमंत कुलांत जन्मलेली असून मी इतका गरीब असतांही त्या साध्वी स्त्रीनें आपल्या अंगच्या अलौकिक सौजन्यादि गुणांनीं, आपली सदां ऐषआरामी थाटांत राहण्याची झालेली संवय माझ्याकरितां— हायहाय ! जाधवराव, केवळ माझ्याकरितांच बाजूला ठेवून, तशा दीन स्थितींतही माझ्या सौख्याकडे लक्ष्य देऊन आपल्या सदाचरणानें माझ्या स्थितीचा मला विसर पाडला. माझ्याकरितांच केवळ दारिद्र्यावस्थेंतील होणारे ते सर्व हाल ती मुकाट्यानें सहन करी. माझ्याकरितांच तिनें प्रत्यक्ष आपल्या आईबापांची सुद्धां फारशी पर्वा केली नाहीं. जास्त काय सांगू, केवळ माझ्या सुखाकारितांच परमेश्वरानें तो रतीच्याही सौंदर्याला लज्जित करणारा गोड चेहरा निर्माण केला होता, यांत संशय नाहीं. पण हाय— आतां त्याचें काय— ( शोकानें बडावून जातो. )

जा०— ( यशवंतरावाचा हात धरून ) यशवंतराव, जाऊं द्या. जितकी जितकी ती स्थिति यावेळेला तुह्मी मनांत आणाल, तितकी ती तुह्माला जास्तच शोकास्पद दिसेल. ईश्वराच्या कोपापुढें कोणाचें काय चालणार ! ठेवील त्या स्थितींतच मुकाट्यानें राहिलें पाहिजे.

य०— यापलीकडे माझ्या स्वाधीन आतां काय राहिलें आहे; व एक अर्धघटकेच्या उरलेल्या माझ्या आयुष्यांत या वेळेला चांगल्या गोष्टींची तरी मी काय अपेक्षा करणार ! जाधवराव, पुढें बरेच दिवस माझा काळ सुखानें जाऊन

मला दोन मुलें झालीं. नंतर माझ्या बुद्धीनें उचल खाऊन माझ्या दीन स्थितीचा मला कंटाळा येऊं लागला, व बराचसा पैसा मिळवून श्रीमंत होण्याच्या उद्देशानें एका शुभ मुहूर्ती— शुभ कसला तो, सान्या अशुभांतली अशुभ मुहूर्तें— मी बराच लांब इकडे चंद्रनगरकडे जाण्याला घरांतून बाहेर पडलों. झालं, माझ्या आयुष्यांत मीं अनुभविलेली तीच शेवटची सुखाची घटका ! माझ्या अनाथ बायकापोरांनां अपार शोकसागरांत ढकलून देणारी तीच ती भयंकर वळ— माझ्या सर्व सुखाशेचा तोच तो अंतकाल ! ! जाधवराव, माझ्याच्यानें आतां जास्त वेळ बोलवत नाहीं. माझी शुद्धि नाहींशी होत चालली— माझीं सर्व गात्रें शिथिल झालीं— प्राणोत्क्रमणाच्या वेळीं होणाऱ्या यमयातना मी भोगूं लागलों, आणि ते पहा-- कालाचे भयंकर पाश ह्या माझ्या मानेभोंवतीं येऊन पडले— ( बेशुद्ध होतो )

जा०— ( घाबरून ) पण यशवंतराव, मला तुम्ही कोणचीशी कामगिरी सांगणार होतांना ? सांगा, मी तुमच्याकरितां काय करूं ? तुमची अखेरची कोणती इच्छा मी पुरवूं ?

य०— ( अंमळ शुद्धीवर येऊन ) जाधवराव, जवळच आहांतना ?

जा०— हा पहा, तुमच्या अगदीं जवळच तुमच्या आज्ञेची वाट पहात बसलों आहें.

य०— तर मग हें काढण्याविषयीं मला अंमळ मदत करा बरें ! ( जाधवराव, यशवंतरावाच्या डाव्या खिशांतील एक मजबूत चामड्याची पिशवी काढून त्याला देतो. ) हेंच ह्याच संबंधानें मी तुम्हाला सांगणार. व माझे जिवलग

दोस्त म्हणून माझी शेवटची इच्छा तुम्हाला पूर्ण करायची ती हीच. ( कांहीं वेळ त्या पिशवीकडे पाहून ) ह्यांतील एकंदर रत्नांची किंमत पंचवीस लक्ष रुपये आहे. घरांतून निघते वेळेस मी फारच उत्सुकतेनें, महत्त्वाकांक्षेनें व आनंदानें ज्या वस्तूच्या प्राप्तिप्रीत्यर्थ निघालों होतों, तिची प्राप्ति तर झालीच, पण ती ही एवढी रकम तुह्मीं शपथ-पूर्वक नेऊन माझ्या बायकोजवळ दिलीत ह्मणजे तत्प्राप्ती-विषयींची माझी सर्व इच्छा परिपूर्ण झाली असें मी समजेन. जाधवराव, खरोखर माझ्यावर एवढे उपकार कराल का? माझा भरंवसा सर्वस्वीं तुमच्यावरच आहे! हाय हाय! माझा अशा रीतीनें अकस्मात् झालेला शेवट तिला कळल्या-वर दुःखातिशयानें ती रडून रडून आकांत करील, माझ्या-वांचून तिला हें सर्व जग उदास वाटायला लागेल. माझ्या-वांचून आपलें जीवित सुद्धां तिला नकोसें होईल. जाधव-राव, माझ्यावांचून दुसरा कुणीही त्राता नसल्यामुळें माझ्या अनाथ पोरांची खरोखर दुर्दशा दुर्दशा होईल! अरेरे! हे विचार मी कसे सहन करूं!

आ०— यशवंतराव, स्वस्थ रहा, तुह्मी कांहीं एक काळजी करूं नका. येऊं नये, पण दुर्दैवानें हा प्रसंग तुम-च्यावर आला. तुह्मी माझ्यावर पूर्ण विश्वास ठेवा. सर्वांवरच प्रसंग येतात, त्यांत एकमेकांनीं एकमेकांना जाणलं नाहीं तर मानवी धर्म काय राहिला! तुमची ही स्थिति पाहून, व तुमच्या तोंडचें हृदयद्रावक वर्णन ऐकून माझें काळीज कसें फाटून गेलें आहे! तुह्मी बेफिकीर असा. मीं माझ्या स्वतःच्या मुलांवर सुद्धां एवढी प्रीति केली नसेन, अशा काळजीनें त्यांना वागवीन; खरोखर तुमची आठवण सुद्धां होऊं देणार नाहीं.

य०— अहाहा ! ! तुमचे हे शब्द माझ्या मनाला कितीतरी आनंद देत आहेत! याप्रमाणेंच तुमच्या हातून कृति घडल्यास— आणखीं मला जास्त काय पाहिजे ? ईश्वर तुह्माला सद्बुद्धि देवो ! जाधवराव, माझी बायको फार सद्गुणी आहे. माझा हा शेवटचा निरोप कळविल्यास ती तुह्माला कधींही विसरणार नाहीं. अनाथ गाईला दुर्धर पंकांतून सोडविल्याचें श्रेय तुह्माला लागेल. मरणोन्मुख झालेल्याला तुमच्या ह्या कृतीनें खरोखर जीवदान दिल्यासारखें होईल. ( थांबून ) माझें घर कांचनपुरांत विलासबागेनजीक हनुमानूरस्त्यावर आहे. तुह्माला गेल्याबरोबर लागलींच सांपडेल. जाधवराव, मी सांगणार होतों, तें झालें, संपलें ! याशिवाय माझी कांहीं एक इच्छा राहिली नाहीं. माझा विश्वासघात न करतां मीं सांगितलेली कामगिरी तुह्मीं पूर्णपणें बजावण्याचें मला अभिवचन दिल्यास हा माझा शोचनीय अंतकाल— पण मला फार सुखाचा होईल !

जा०— ईश्वर साक्ष आहे. ह्या ठिकाणीं सर्वांना सोडून माझ्यावरच जो तुमचा विश्वास जडला, ह्यावरून माझे मनाची तुह्माला खात्री असलीच पाहिजे, तिचा उपयोग मी कशा रीतीनें करीन हें पाहणार तो सर्वसाक्षी ईश्वर आहे. आज हा प्रसंग तुमच्यावर आहे, चार दिवसांनीं तो माझ्यावरही येईलच; त्यावेळेस ही तुमच्याशीं बेइमानी केल्याबद्दल मी परमेश्वराजवळ काय जबाब देऊं ! छे. छे. यशवंतराव, नका असा त्रास करून घेऊं.

य०— नाहीं, नाहीं. माझा तुमच्यावर विश्वास आहे. हा मी आतां चाललों ! जाधवराव, बोलून दाखविल्याप्रमाणें कृति करा. ( खोल स्वरानें ) माझ्याशीं बेइमानी केल्यास त्याचें प्रायश्चित्त ईश्वर तुह्माला लवकरच देवो !

( यशवंतराव प्राण सोडतो ! )

जाध०—( गतप्राण झालेल्या यशवंतरावाकडे पहात पहात उठून ) झालं, आटपला बिचारा! सर्व उपद्व्याप, त्रास, सुखदुःख, आनंद, खेद इत्यादि अनेक विकारांनीं परिपूर्ण असें हें जग सोडून परलोकीं कायमचा चालता झाला ! मनुष्याचें आयुष्य ह्मणजे किती क्षणभंगुर आहे पहा. वाटेल तितके बेत मनुष्य करीत असतो; उच्च पदाची आशा पूर्ण-पणें मनांत धरून त्याकरितां प्रसंगविशेषीं प्राणसुद्धां खर्चीं घालण्याला मागें पुढें न पाहतां आपल्या आटोक्याबाहेरचे असेही अनेक प्रयत्न करितो; पण त्या सर्व इच्छा, ते सर्व बेत जागच्या जागीं राहून वेळ आली कीं, भयंकर मृत्यूची गदा यायची ती येतेच ! गरीब श्रीमंत, लहान थोर, सुशील दुष्ट, कसाही असो, त्या कृतांताला त्याची क्षणा-चीही मुरवत तुटत नाहीं. ( यश०कडे पाहून ) अहाहा ! जीवांत जीव होता तोंपर्यंत या हातांनीं किती तरी बरीं वाईट कामें केलीं असतील ! कुठून कुठून तरी हे पाय फिरून आले असतील ! ह्या मुखांतून काय काय तरी शब्द बाहेर पडले असतील ! नेत्रांनीं किती तरी सुंदर सुंदर वस्तु अवलोकन केल्या असतील ! पण आतां काय— एक देहां-तून प्राण निघून जातांच सर्व गात्रांचीं कामें अजीबात बंद पडलीं! हे सशक्त हात, पण आतां अगदीं निकामी झाले. धनुष्याकृति कमानदार भुंवयाखालील हे पाणीदार डोळे अगदीं तेजहीन झाले काळजीपूर्वक जपून वापरीत असलेल्या ह्या पोषाखाची अगदीं दुर्दशा उडाली आणि हा सुकुमार, सुंदर, तेजःपुंज चेहरा— पण क्षणार्धांत मातीला मिळाला ! परमेश्वरा, किती अघटित तुझी ही कृति ! मनुष्यमात्राला बरें वाईट समजून देणारी

एक बुद्धि जर या जगांत तूं कुणाला दिली नसतीस तर आजच्या या अशा प्रसंगांचें स्वरूप खरोखर इतकें भयंकर व हृदयद्रावक कधींही झालें नसतें ! ( थांबून ) असो. जें होणार तें कधीं चुकत नाहीं, एवढें मात्र खरें. मरणसमयीं यशवंतरावाची शेवटची इच्छा काय, तर हीं रत्नें त्याच्या अनाथ बायकापोरांना मीं नेऊन पोंचतीं करावीं, व याच्या निधनानें आलेला त्यांचा आपत्काळ त्यांना कमी दुस्सह वाटावा, हीच. हो पण शेवटीं त्यानें काय बरें शब्द उच्चारले ! " जाधवराव, माझ्याशीं बेइमानी केल्यास त्याचें प्रायश्चित्त ईश्वर तुह्माला लवकरच देवो ! " हे शब्द ह्मणजे माझ्या कानांला कसेसेच लागतात. मी आनंदाच्या अगदीं भरांत असतांना सुद्धां पुढें या शब्दांची आठवण झाली, ह्मणजे ते माझ्या सर्व आनंदाचा अगदीं विरस करून टाकतील. हे शब्द, माझ्या हातांनीं ह्मटल्याप्रमाणें कृति न झाल्यास, अहोरात्र माझ्या मनाला खात राहून मला अगदीं निःशक्त करून सोडतील माझ्या जन्माचें मातेरें करून माझ्या सुखाचा नायनाट करतील. आणि कदाचित् माझे पंचप्राण सुद्धां हरण केल्यावांचून राहणार नाहींत ! ( सुस्कारा टाकून ) छे. छे. अशी वेळ कधींही न यावी असेंच मी इच्छितों; पण नुसती इच्छा करून काय उपयोग ? त्याप्रमाणें हांतून कृति करून दाखविली पाहिजे तरच त्यांत कांहीं अर्थ !

( निघून जातो. पडदा पडतो. )

**प्रवेश १ ला समाप्त.**

---

# प्रवेश २ रा.

स्थळ— कांचनपुरांतील एक रस्ता.

( मदन एकटाच चिंतातुरसा प्रवेश करितो. )

मदन- ( आपल्याशीं विचार करीत ) काय बरं मला कुसुमनें सांगितलं ! कीं, मालती आपल्या मावशीच्या घरीं कांहीं जरूरीच्या कामाकरितां गेली असून ती लवकरच परत येणार आहे हेंच नाहीं कां ? होय हेंच आणि कुसुम तरी असें अगदीं खोटें नाहीं सांगणार, तिची माझ्या ठिकाणीं पूर्वी फार प्रीति होती पण तिला अलीकडे निराळेंच वळण लागलें आहे आणि ही गोष्ट आह्मां दोघांनाही खरोखर फार इष्ट आहे, कुसुमचें प्रेम विलासावर जडल्यामुळें, मालतीबरोबर माझा विवाह होण्याला कांहींच अडचण राहिली नाहीं, आह्मां दोघांचें प्रेम एकमेकांवर जडल्याबद्दलचा मोबदला खात्रीनें आणि लवकरच मिळणार ह्या सुखाशेनें माझे दिवस मोठ्या आनंदांत जाऊं लागले, आमचा दोघांचा विवाह कसा लवकर होईल याच गोष्टीची मात्र मला काळजी लागून राहिली आहे. दुसऱ्याचा उत्कर्ष स्वतःला सहन होत नाहीं, दुसऱ्याचें सौख्य स्वतःला निमुटपणें पाहवत नाहीं असे विचित्र मत्सरी पुतळे ह्या जगांत बरेच सांपडतील; पण प्रत्यक्ष आपले ह्मणविणाराला सुद्धां- आपला सख्खा भाऊ- प्रत्यक्ष पोटचा मुलगा - याच्या सौख्याआड येणाऱ्या माणसांची संख्या अलीकडे दृष्टीस पडते, फार काय, पण माझ्या नशीबानें मलाच अशांचा अलीकडे फार त्रास होऊं लागला आहे, माझा बंधू गुलाब— मुलाचें नांव काय ह्मणे गुलाब,

पण तो तर माझा अलीकडे जणूं हाडवैरी होत चालला आहे. गुलाबांच्या कांट्यासारखींच याचीं कृत्यें भयंकर, पण गुलाबाला निदान वास तरी चांगला येतो; मूळ झाड जरी कांटेरीं असलें तरी त्यापासून उगवणारीं फुलें तरी सुवासिक, मोहक, व जवळ बाळगण्यासारखीं असतात; पण त्या मानानें तुलना करून पाहिली असतां स्वतः जरी भयंकर कृत्य करणारा केवळ पुतळा तो असला, तरी वरून सुद्धां लोकांजवळ त्याचें वर्तन कधींही चांगलें रहात नाहीं. करणी खाटकाची, पण वाण सुद्धां गाईचा नाहीं, एरवीं नुसता वाण गाईचा असून नसून सारखाच. माझ्या प्रत्येक कामांत तो अलीकडे बिघाड आणूं पहातो हा लहान आणि मी वडील, दोघेही सख्खे बंधु, तेव्हां बापाच्या पश्चात् असलेल्या संपत्तीचा अर्धा भाग हक्कानें माझ्याकडेस येणार ही गोष्ट तर त्याच्या मनांत सारखी सलतेच, पण ज्याच्यांत खरें पाहिलें असतां त्याचा कांहीं एक संबंध नाहीं, त्या गोष्टींत सुध्दां मन घालून मला होईल तितका त्रास देण्याचा त्याचा जणूं निश्चयच झाला आहे. शिरक्याच्या मालतीवर माझें मन बसलें ही गोष्ट त्याला मुळींच इष्ट नाहीं, मग कां नसावी हें त्याचें त्यालाच माहीत ! ( धावून ) अं: कसेंही होवो, आपला निश्चय जो एकदां झाला तो ह्मणून सोडावयाचा नाहीं. ह्या अशा क्षुद्र संकटांच्या भीतीनें आपल्या प्रिय मालतीला दिलेलें वचन मी कधींही मोडणार नाहीं. अहाहा ! तिचा तो मोहक चेहरा माझ्या नेत्रासमोर आला ह्मणजे माझ्या मनाला किती आनंद होतो ह्मणून सांगूं. माझी तहानभूकसुद्धां क्षणभर हरण होते ह्मटलें तरी चालेल ! आतां तो चेहरा नेहमीं दृष्टीस पडावा

याकरितां शिरक्यांच्या इथें जाण्याची मला मनाई आहे असें मुळींच नाहीं. आमचें दोघांचें एकमेकांवर प्रेम जडावें, मालतीनें मलाच वरावें ही गोष्ट तिच्या आईलाही मान्य आहे; पण माझा स्वभाव फारच भिडस्त असल्यामुळें कांहीं-एक कारण नसतां उगीच त्यांच्या इथें जाणें मला मुळींच प्रशस्त वाटत नाहीं आणि मालतीला तर आमच्या येथें येण्याची सक्त मनाई आहे. तेव्हां आजचा हा योगायोग फारच बहारीचा होणार यांत शंका नाहीं. याविषयींची बातमी कुसुमनें मला अंमळ उशीरानेंच सांगितली म्हटली पाहिजे. दिवस मावळायला आतां काय सारी घटका दीड घटकाच उरली आहे. ( समोरपाहून ) पण हें काय एकमेकांच्या दर्शनाला उत्कंठित झालेल्या प्रेमळ जोडप्यांना क्षणभर सुखानें काळ घालवायला सर्वांत सोईस्कर अशी ही विलासबाग समोर दिसूं लागली. अहाहा ! याच रस्त्यानें ती परत येणार! ( पाहून ) पण आलीच ती ! काय होईल तें होवो. आज आपण तिची भेट घेऊन एकदां काय तो पक्का बेत ठरविल्यावांचून कधींही राहणार नाहीं.

( मालती प्रवेश करिते. )

( तिला उद्देशून ) मला वाटलं, कीं अंमळ उशीर होऊन वेळ टळल्यामुळें तुझ्या सुखकर भेटीला मी अंतरलों, व अनायासें आलेला हा कपिलाषष्ठीचा योग व्यर्थ दवडला, पण नाहीं. आज माझा खरोखरच भाग्योदय होणार होता यांत संशय नाहीं.

मालती— ( त्याला पाहतांच लाजेनें खालीं मान घालून गालांतल्या गालांत हंसत ) पण मी आज यावेळेस इकडे येणार हें आपल्याला कुणी सांगितलं ?

मदन०— अं: सांगितलं आपलं कुणीतरी. आज बरेच दिवसांत तुझी भेट न झाल्यामुळें तुझ्या दर्शनाला मी फारच आतुर झालों होतों आणि ह्मणूनच हरप्रयत्नानें मीं आज तुझी भेट घेतली. मालती, मन हें फारच वेडें आहे. एकदां कोणत्याही वस्तूचा त्याला निजध्यास लागला ह्मणजे त्यांकरितां तें कुठपर्यंत धांव घेईल याचा कांहींच नियम नाहीं; आणि ती वस्तु एकदां प्राप्त झाल्याशिवाय तें कधींही स्थिर व्हायचें नाहीं. बहुधा तुझाही अनुभव असाच असेल.

मालती—हा प्रश्न नेहमींचाच माझ्या डोळ्यांसमोर, व तो सोडविणें ह्मणजे मला फारच गूढ पडलें आहे. मनुष्य-मात्राला हा मनोविकार नेहमीं त्रासवीत रहातो.

मदन— आणि इच्छित वस्तूची प्राप्ती, याशिवाय त्याचें शमनही कोणत्या अन्यत्र उपायानें व्हायचें नाहीं. नाहीं तर तें तसेंच बळावत जाऊन कदाचित् त्यापासून भलताच परिणाम व्हायचा.

मा०— हो, हें मात्र अगदीं खरेंच.

म०—अगदीं खरेंना, मग मी तुला नेहमीं काय ह्मणत असतों. अलीकडे माझे मनोविकार फारच उच्छृंखळ झाले आहेत, व त्यांच्या अनावरपणामुळें मला नेहमीं फार त्रास होतो. त्याजवर बरोबर लागूं पडेल असें औषध फक्त तुझ्याजवळच आहे, व त्याशिवाय इतर कशानेंही त्याला गूण यायचा नाहीं असेंच माझ्या मनाला अलीकडे वाटूं लागलें आहे. मालती, तुझ्या कोंवळ्या मनाचा मला अनुभव आहे. कुणीही कोणत्यातरी रोगानें अगदीं त्रस्त झालेला असतांना, त्या रोगाचें निरसन तुझ्या हातून होण्यासारखं असल्यास तसें न करतां त्याला तसाच हालांत राहिलेला खरोखर तुझ्यानें पाहवणार नाहीं.

मा०—( किंचित हंसून ) समजलें मी आपल्या ह्मण-ण्याचा अर्थ, पण नुसता रोगी व त्यावर लागूं पडणारें औषध जरी असलें, तरी त्याची पूर्णता व्हायला आणखीही कांहीं गोष्टींची अवश्यकता असते. ( निराशेनें ) ती नसली तर नुसत्या औषधाचा काय उपयोग !

म० — ( तिचा हात धरून ) हेंच हेंच, याच संबं-धानें आज मला विचार करायचा आहे. मालती, चल आपण क्षणभर ह्या विलासबागेंत जाऊन बसूं.

मा०— पण उशीर नाहीं कां होणार, आतां खरंच गडे आणखी वेळ नाहीं. घरीं आई माझी वाट पहात असेल.

म०— छे: इतकी घाई कां ! अशी संधी फिरून कधींही यायची नाहीं. तुझी आई वाट पहात असेल खरी, पण तूं तिची समजूत हवीतशी करूं शकशील. तुझी स्थिती माझ्यासारखी शोकास्पद नाहीं. शिवाय मावशीच्या घरीं गेलें होतें, चार घटका आल्यासारखी बैस तरी, ह्मणून तिनें आग्रहपूर्वक राह-वून घेतलें, ही चांगलीच सबब तुला आज सांगायला आहे. मालती ह्या बरेच दिवस कुजत पडलेल्या गोष्टीचा एकदां काय तो सोक्षमोक्ष मला करून टाकावयाचा आहे. आजप-र्यंत जें झालं तें झालं , पण दुसऱ्याच्या विनाकारण पोकळ भीतीनें आपलें सर्वस्वी नुकसान करून घेण्याइतका मूर्खपणा या पुढें तरी माझ्या हातून खचित होणार नाहीं. ये, बैस अशी.

( दोघेंही विलासबागेंत जाऊन बसतात. )

मा०—काय करावं ! मला तर असं वाटूं लागलें आहे कीं, ज्या वस्तूचा लाभ आपल्याला कधींहि व्हावयाचा नसेल, तिचें दर्शनच होऊं नये हें फार चांगलें. ती दृष्टीस पडून आपल्या मनांत उतरल्यास तिच्या प्राप्ती विषयींची तळमळ जिवाला सारखी लागून राहते.

मदन—हो हें खरं. याचा मला—मला काय सर्वांनाच अनुभव असेल; आणखींही त्यांत गम्मत ही कीं जसजसे त्या वस्तूच्या प्राप्तीच्या मार्गांत जास्त जास्त अडथळे येतात, तसतशी तिच्या प्राप्तीची मनांतील इच्छा जास्त जास्त अनावर होते, व ते आडथळे नाहींसें करण्याचें अंगांत सामर्थ्य नसल्यास, किंवा तसें होणें शक्य नसल्यास ह्या दुःखाला पारावार नाहींसा होतो. मालती, या जगांत अशा-प्रकारच्या येणाऱ्या अनेक संकटांतून जो शिताफीनें निभावून जातो, तो मात्र खरा भाग्यवान समजला पाहिजे.

मालती—( सुस्कारा टाकून ) असे दैववान प्राणी क्वचि-तच आढळून येतील. दुसरें कशाला—प्रत्यक्ष आपल्याच स्थितीचा क्षणभर विचार केला ह्मणजे ह्या गोष्टीची सत्यता पूर्णपणें नजरेसमोर दिसूं लागते. मला असं वाटतं, कीं विवाह होऊन पुढें आजन्म कल्याण होण्याचे ज्या हतभाग्यांच्या नशीबांत लिहिलेलें नसेल, अशा जोडप्यांचे परस्परांवर प्रेम पूर्वीच न जडलेले फार चागलें.

म०—मालती, या गोष्टींचा विचार पूर्वी मला फार त्रास देत होता. आपल्या प्रेमांत येऊं पाहणारे कांहीं अड-थळे माझ्या मनाला स्वस्थ राहूं न देतां रात्रंदिवस निराशेच्या तीव्र डागण्या देत होते. जितके मनुष्य एकमेकांपासून दूर तितकी त्यांची प्रीती कमी कमी होत जाते, ह्मणून येथें अशा कष्टानें दिवस काढण्यापेक्षां तुझ्यापासून बरेच दूर अशा ठिकाणीं कायमचें जाऊन सारा जन्म तिकडेसच काढावा असा माझा पूर्वी विचार झाला होता. पण ते दिवस जसे निघून गेले, तसा आतां तो विचारही बदलला. मालती, ह्या आपल्या कृत्याला कुणी कांहींही ह्मणो, आपल्या दोघांचा.

विवाह झाल्यानें कुणाला आनंद होवो. अगर दुःख होवो. प्रत्यक्ष ज्यांच्यापासून आपला जन्म, आपल्या बऱ्या वाईट प्रत्येक गोष्टीमध्यें, मन घालण्याचा ज्यांना पूर्ण अधिकार आहे, अशा दोन्हीं घराण्यांचा ह्या संबंधानें आपल्यावर भयंकर कोप झाला तरी पुरवला, मी त्याची मुळींच पर्वा करीत नाहीं; फार काय पण ह्या कांचनपुराला शेवटचा रामराम ठोकून एखाद्या अगदीं परमुलुखांत दारिद्र्यावस्थेंत दिवस काढण्याचें जरी माझ्या नशीबाला आले, तरी ह्या प्राप्त होणाऱ्या सर्व संपत्तीला, ऐश्वर्याला, मानमरातबाला पार झुगारून देऊन तो प्रसंग सुद्धां मी तुझ्याकरितां मोठ्या आनंदानें सहन करीन! पण मालती तुझी ह्या गोष्टीला पूर्ण संमती पाहिजे. तुझ्याशिवाय माझें आयुष्य व्यर्थ—असून नसून सारखेंच होणार!

मा०—हें काय! मदनराज, एवढें हाल, एवढे कष्ट सोसण्याला तुह्मी तयार झालांत? आणि ते केवळ माझ्याकरितां! छे, छे. आपल्या अनुपम रूपगुणांनीं तुह्माला वरून, तुमचा सारा जन्म जी धन्य करील; तनमनधन तुमच्याठायीं अर्पण करून अहोरात्र तुमच्या सेवेंत आपला देह झिजवील; जिच्या सहवासामुळें ह्या तुमच्या विपुल संपत्तीसह तुह्मी मोठ्या आनंदांत नांदाल; जिच्या मुखांतून निघालेला प्रत्येक प्रेमळ शब्द, कचित्प्रसंगीं त्रस्त झालेल्या तुमच्या मनाचें क्षणार्धांत शांतवन करील; जिच्या स्वरूपांतील मोहकपणा प्रत्यक्ष स्वर्गीच्या रंभा, उर्वशी, मेनका ह्या अप्सरांत सुद्धां आढळणार नाहीं; उच्च कूळ, श्रीमंत घराणें, मनोहर स्वरूप इत्यादि गुणांनीं जिचा तुमचा जोडा ह्मणजे कसा अप्रतीम शोभेल; अनेक प्रकारांनीं हौस

पुसून जिला संतोषित करण्यांत तुह्माला मोठा आनंद वाटेल, अशी माझ्यापेक्षां—ह्या दीन स्थितींत दिवस काढणाऱ्या मालतीपेक्षां तुमच्या योग्य, कितीतरी प्रकारांनीं चांगली स्त्री तुह्माला मिळेल ! असें असतां केवळ माझ्याकरतां तुह्मी आपली एवढी संपत्ती, आपले आप्तजन, आपलें सौख्य व आपला देश सोडून परदेशीं जाण्याला तयार व्हावें, हें खरोखर चांगलें नाहीं.

मदन— छे. छे. मालती, ही गोष्ट तूं स्वप्नांत सुद्धां आणूं नकोस. शद्वांशिवाय इतर उपायांनीं, माझें तुझ्याठायीं किती प्रेम आहे, केवळ तुझ्या करतां माझा जीव किती तुटतो, हें जर मला कळवितां आलें असतें, तर यावेळेस तुझ्या मनाची मी हवीतशी खात्री करून दिली असती. तुझ्याहून शंभरपटीनें जरी अधीक सद्गुणी स्त्री मला मिळणार असली, जिच्या प्राप्ती मुळें असलेल्या वैभवांत भर पडून ऐश्वर्याच्या शिखरावर जरी मी जाणार असलों, प्रत्यक्ष लावण्याची खाण अशी रंभा, उर्वशी ह्यां पैकीं जरी एखादी येऊन मला आतां वरण्याला तयार झाली, तरी त्यां कुणाचीच मला तुझ्यापुढें मातबरी वाटत नाहीं. मालती, निस्सीम प्रेम ही कांहीं विलक्षण चीज आहे. ज्या ठिकाणीं तें एकदां जडतें, त्या ठिकाणाहून तें नष्ट होणें ह्मणजे किती असंभाव्य, किती दुरापास्त, किती अशक्यच आहे, याची कल्पना, निस्सीम प्रेमाचा योग्य मोबदला न मिळाल्यामुळें ज्यांच्या देहाचें तशा स्थितींतच शोचनीय पर्यवसान झालेलें आहे, अशा कित्येकांचीं चरित्रें तूं आपल्या मनांत आणलीस ह्मणजे तुला सहज होण्यासारखी आहे. प्रेम मात्र तसें पाहिजे. मालती, खऱ्या प्रेमाची

किंमत तुला कळत नाहीं असें नाहीं. तूं तशीच सूज्ञ आहेस. माझा हा प्राण—हें माझें जीवित केवळ तुझ्याकरितांच आहे, एवढी तूं आपल्या मनाची खात्री ठेव म्हणजे झालें. जास्त काय सांगूं !

मालती—आपलें मन मी ओळखीत नाहीं असें नाहीं; आपल्या प्रेमाची मला कल्पना आहे, व आपल्याकरतां माझेंही मन किती अतुर होतें, याची कल्पना अपणालाही असेलच. पण काय करणार ! नाइलाजाची गोष्ट आहे. आपला माझा मोठ्या आनंदानें विवाह होईल असें कांहीं मला वाटत नाहीं !

म०—( आतुरतेनें ) तें कां बरें ? याला काय हरकत आहे ? तुला दिलेलें वचन माझ्याकडून पाळलें जाणार नाहीं— मी आपला शब्द असत्य करीन, असं कां तुला वाटतं ? कीं ही गोष्ट घडून येणें, हें मुळीं तुझ्याच मनांतून नाहीं. ?

मा०—छे. छे. असं मुळींच नाहीं; पण याला आणखीं इतर बरेच अडथळे आहेत. ते नाहींसे झाल्याशिवाय आपला मार्ग आपल्याला मोकळा व सुखावह कधींही होणार नाहीं !

म०—कोणचे ते एकदां ऐकूं दे. तुझ्याकरितां मी हवीं तीं संकटें सोसण्याला तयार आहें. हें मी तुला पूर्वींच सांगितलें.

मा०—एक तर माझ्याशीं तुमचा विवाह होणें ही गोष्ट तुमचे वडील जाधवराव यांना मुळींच इष्ट नाहीं, आणखी माझ्या आईला जाधवरावांचा स्वभाव, त्यांची चालचलणूक ही पसंत नसल्यामुळें तुम्हाला जरी ती फारच चाहते, तरी जाधवरावच्या घराण्याशीं हा संबंध घडवून

आणण्याला ती तयार होईल, असें कांहीं मला वाटत नाहीं. अंमळ स्पष्ट बोललें त्याची क्षमा असावी.

म०—तुझी आई ह्या गोष्टीला कबूल व्हायची नाहीं, असं मला पूर्वी वाटत होतं, पण ती भीति आतां मुळींच नको. माझे वडील जाधवराव यांजकडन जरी ह्या बाबतींत चांगलाच अडथळा होण्याचा संभव असला, तरी त्यांची मर्जी संपादन करून पुढें सारा जन्म दुःखांत घालविण्यां-पेक्षां तुझ्याशीं विवाह करून त्यांची इतराजी झालेली पाह-णेंच मला ज्यास्त प्रिय आहे. मालती, माझी सहचारिणी होण्याला तूं तयार आहेस एवढें मला कळूं दे, ह्मणजे मला दुसरी कशाचीही इच्छा नाही.

मालती-( कांहींवेळ स्तब्ध राहून ) अशा स्थितींत मी आपणाला जास्त काय सांगूं ?

मदन -जें मला अत्यंत इष्ट आहे तेंच. दुसरें कांहीं एक नको.

मा०- ( खालीं मान घालून ) ठीक आहे, माझें या गोष्टीला अनुमोदन आहे. ही गोष्ट होऊं नये असं माझ्या मनांत कधींच आलं नाहीं.

म०- ( हर्षातिशयानें तिला आलिंगन देऊन ) अहाहा ! मालती, तुझ्या ह्या शब्दांनीं आज मी खरोखर धन्य झालों. ही आपली उभयतांची इच्छा तो जगन्नियंता परिपूर्ण करो. मालती, आजपासून तूं माझी झालीस.

( इतक्यांत एकदम कुणी आल्याचा आवाज ऐकूं येतो. दोघेही दचकून उभीं राहतात. गुलाब प्रवेश करतो. )

गुलाब— ( जवळ येऊन ) ठीक चाललं आहे.

जन्माला आल्याचं खरं सार्थक ह्मणजे हेंच, व हीनकुळां-
तील दरिद्री अशा स्त्रीची प्राप्ती, याशिवाय धन्य करणारी
या जगांत दुसरी काय चीज आहे !

म०— ( रागानें उठून पुढें येऊन ) गुलाब, अशा
ठिकाणीं एकदम तुला यायला कुणी सांगितलं ?

गुलाब— कांचनपुरांतील ही विलासबाग, जाधव-
राव शिंद्यांच्या मुलांपकीं कुणीही खरेदी केलेली नाहीं, किंवा
कुणाला आंदणही मिळालेली नव्हे, हें मला पूर्णपणें
माहीत आहे, त्याअर्थी अशा ठिकाणीं यायला माझा मी
मुखत्यार आहें. मला कुणाच्याही परवानगीची जरूर नाहीं.

म०— पुरेकर तुझा हा फाजिलपणा. तुझा तूं मुखत्यार
आहेस तर दुसऱ्याच्या कारभारांत हात घालण्याची तुला
काय जरूर होती ? तुझें माझ्याशीं नेहमीं हें अशा प्रकारचं
वर्तन मुळींच चांगलें नाहीं.

गुलाब०—माझा स्वभाव तसा पडला त्याला नाइ-
लाज आहे, व तो बदलणं हें काम कुणाच्याही हातचं नाहीं.
ज्यांच्या आज्ञेप्रमाणें आपणाला नेहमीं वागलं पाहिजे, ज्यांचा
अधिकार ह्मणून त्यांना मान देणें हें आपलें कर्तव्यकर्म
आहे, व अशा वडील माणसांपैकीं घरीं कुणी आहे कीं
नाहीं, याची पर्वा नबाळगणाऱ्या व तासचे तास घरांतील
अडचणी न जुमानून बाहेर घालविण्याची संवय झालेल्या
तुला बाबांनीं सूचना करावी ह्मणून मला पाठविलें आहे.
जेवणाची वेळ टळून इतकी रात्र झाली तरी तुझा कुठें
ठिकाण नाहीं, हें पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलं;
पण अशा अलभ्य लाभापुढें तुला आज जेवणखाण याची
सुद्धां कांहीं जरूर नाहीं असं मला वाटतं ! होय ना ?

म०—( आवेशानें ) बस्स कर. जास्त एक अक्षर सुद्धां मी आतां ऐकणार नाहीं. मला सूचना करण्याला तूं नको आहेस. कुणाचा मान कसा राखावा, हें तुझ्यापेक्षां मला पुष्कळ समजतं. फाजील भाषण करून माझें मन खवळून टाकण्यांत कांहीं अर्थ नाहीं. चल, चालता हो इथून मुकाटयानें.

गुलाब— ठीक आहे, मलाही आतां इथें राहण्याची कांहीं जरूरी नाहीं. हा मी चाललों.

( मालतीकडे पहात पहात गुलाब निघून जातो. )

म०—( विलासबागेच्या बाहेर येऊन ) काय बदमाष कारटा आहे तरी हा ! बंधुप्रेमाचा हा असा मासला कुणाच्या ऐकण्यांत किंवा पाहण्यांत कचितच येत असेल !

मालती—पण मला बाई याची भीती वाटते ! मदनराज, आपल्या सौख्याच्या आड येणारे कितीतरी अशाप्रकारचे अडथळे नेहमीं माझ्या मनाला अस्वस्थ करीत असतात ह्मणून सांगू. पण फिरून तुमच्याकरितां ह्मणून माझें मन त्यांना बाजूला सारून पुढें धांव घेतें. तुमचा सख्खा भाऊ खरा, पण स्वभावांत किती तरी अंतर ! मला तर हा फारच खुनशी स्वभावाचा मनुष्य दिसतो, व त्याचा नेहमीं तुमच्यावर फार कटाक्ष आहे. काय होईल तें खरें!

मदन—दिसतोसा काय—तो मनुष्यच तसा चमत्कारिक आहे; तरी पण त्याची भीति बाळगण्याचें कांहीं तुला कारण नाहीं. तो आपल्या लहरींत असला ह्मणजे कुणालाही— प्रत्यक्ष आपल्या बापालाही जुमानीत नाहीं. मालती चल आतां जाऊं, बोलण्यांत राहिल्यानें वेळ जाऊन रात्र,

बरीच झाली, पण उशीर व्हायचाच तर तो एकदा झालेला बरा, असा माझा समज आहे. आजच्या प्रसंगाविषयींची हकीकत तूं कदाचित् आपल्या आईला सांगशीलच तर हा गुलाबचा आडदांडपणा खेरीज करून बाकी सर्व आणि तें सुद्धां तिच्या मनाला यत्किंचितहि वाईट न वाटेल अशा रीतीनें सांग. मीही आतां जातों. उद्यां कदाचित् भेटलों तर भेटेन.

मा०– ठीक आहे, मी येतें तर आतां ( स्वगत ) ईश्वरा, आह्मां मानवांना, अक्षय सुखांत किंवा अक्षय दुःखांत ठेवणें हा अधिकार सर्वस्वी तुझा आहे. मनुष्य आशा फार करितो पण त्याप्रमाणें घडवून आणणं हें काम कांहीं त्याच्या स्वाधीनच नाहीं. ( उघड ) उद्यां जरूर भेट घ्यायची ह्मणते. मी आपली फार वाट पहात राहीन.

म०—ठीक आहे.

( मालती मदनाकडे पहात पहात निघून जाते )

अहाहा ! तिचें माझ्याठायीं निस्सीम प्रेम आहे, यांत शंका नाहीं. पण मी ह्मणजे कोण व माझी खरी स्थिती काय, याचा विचार करूं लागलों, ह्मणजे— माझ्या मनाला कसंसच वाटतं, जाधवराव शिंद्याच्या अलोट संपत्तीचा मालक होऊन रात्रंदिवस श्रीमंतींत नांदण्याचा माझा अधिकार, पण खरी स्थिती पाहिली तर, पांच, सहा रुपड्यांवर वाटेल त्या कामांत आपला देह झिजवून काबाडकष्ट करणाऱ्या तेथील हलक्या नोकराहून सुद्धां माझी योग्यता कमीच आहे ! नेमलेलें काम करण्यांत अमळ चूक झाली कीं ज्याप्रमाणें नोकराला लाथ मारून खुशाल काढून देण्यांत येतें, त्याप्रमाणें माझाही मी स्वतंत्र नाहीं; अंमळ असा बाहेर वागलों

कीं, हकालेदेव, अशीच माझी स्थिती होणार ! शिरक्यांच्या घराण्याशीं बाबांचें एवढें हाडवैर राहण्याला काय कारण झालें असेल तें असो. ( थांबून ) आणि त्या ठिकाणीं माझें प्रेम, ह्मणजे आपल्या हातांनीं जाणून बुजून आपला घात करून घेण्यासारखें होणार आहे.– पण काय ! ( अंमळ आवेशानें ) मालतीवरील प्रेमामुळें आपल्या हातांनीं आपला घात–घात घात ह्मणजे काय— कसा घात ह्या वरपंकीं क्षणिक सुखावह भासणाऱ्या संपत्तीवरील माझा हक्क अजिबात नाहींसा होणं याला कां मी माझा घात असें समजतों ! छे, छे. किती चुकीची ही कल्पना ! मग जीवित नाहींसें होणें, हा अलभ्य लाभ झाला समजायचा ! संपत्ती, संपत्ती ह्मणजे काय त्रिशाद ! ह्या जगांत जिवंत राहूनच ना संपत्ती मिळवावयाची ! देहांत प्राण आहे, तोंपर्यंतच ना ह्या सर्व सुखांची किंमत ! मालती ह्मणजे माझा प्राण आहे. तिच्या वरचें माझें प्रेम जबरीनें नाहींसें करणें, ह्मणजे शरीरांतील प्राण ओढून काढण्यासारखेंच होणार ! मग त्याकरितां मला दारिद्र्यावस्थेंत दिवस कंठावे लागतील, ह्या क्षुल्लक गोष्टीला काय मी भितों! माझ्या आंगांत जर हिंम्मत आहे-हातांत बांगड्या भरलेल्या नसून जर मी आपल्याला मर्द ह्मणवीत आहे, तर कष्ट करून पैसा मिळविण्याचें मनावर न घेतां, आयत्या मिळणाऱ्या संपत्ती- करतां काय ह्मणून तरफडतों ! खरोखर अशा नरपशूंना धिःकार धिःकार असो. बस्स; नाहीं—असें कधींही होणार नाहीं. ज्या घरांत सुखासमाधानानें माझा काळ जाणार नाहीं—ज्या घरांतील प्रत्येक मनुष्यमात्राचा स्वभाव ह्मणजे माझ्या स्वभावाच्या अगदीं उलट आहे, त्या

ठिकाणीं क्षणोक्षणी होणारी मानहानी सहन करीत कुजत न राहतां तसा प्रसंग आल्यास क्षणार्धांत तें पार सोडून जाण्याला मला तयार झालेंच पाहिजे. बस्, हाच माझा निश्चय—

( निघून जातो. )

**प्रवेश २ रा. समाप्त**

---

# प्रवेश ३ रा.

::o::

स्थळ— जाधवराव शिंद्यांचें घर.

( जाधवराव एकटाच बसलेला आहे असा प्रवेश होतो. )

जाध०— नाहीं, नाहीं. तो मी नव्हे. तो जाधवराव मी खास नव्हे. दहा वर्षांमागें मी जो जाधवराव होतो, तो मी आज नाहीं. कुसुमपुराहून कांचनपुराकडे येणाऱ्या जहाजावरील मुख्य कप्तान ह्मणून नावांजलेला जो जाधवराव शिंदे त्याच्यांत आणि माझ्यांत आजमित्तीला जमीन अस्मानचें अंतर पडलें आहे. अंतकाळीं यशवंतरावाच्या तोंडून ऐकलेल्या त्या हृदयद्रावक स्थितीचें वर्णन ज्या ह्या माझ्या काळजाचें पाणी पाणी करून टाकीत होतें; तिचाच त्याच्या अनाथ बायकांपोरांच्या झालेल्या शोचनीय स्थितिमुळें पुढें अहोरात्र त्यांजकडून होणारा प्रतिध्वनी आता त्याच माझ्या हृदयाला एक तिळभरही द्रव आणीत नाहीं! नवनीताहून मृदु असलेलं माझं त्या वेळचं हृदय आतां वज्राहूनही कठीण बनलें आहे. कृतज्ञतापूर्वक त्याची शेव-

टची कामगिरी बजावून त्याला दिलेल्या वचनांतून मुक्त होण्याकरितां, शिरक्यांच्या येथें धांव घेण्याची ज्या ह्या माझ्या मनाला त्यावेळेस अतोनात उत्कंठा लागली होती, त्याच मला आतां त्यांचे दर्शन-नव्हे नुसतें त्यांचे उच्चारलेलें नांव सुद्धां असह्य झालें आहे. काय ही माझी स्थिती ! आणि ह्या सर्वांला कारण—कल्पनाशक्तीच्या बाहेरचा असा हा माझ्या स्वभावांतील फरक पडण्याला मुख्य कारण, काय तर-पैसा, पैसा ह्मणजे खरोखर फारच अजब चीज, अजब मोहनी, मनाला जखडून टाकणारा असा हा अजब मोहपाश आहे! पंचवीस लक्ष रुपये, ह्मणजे कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे; निमिषमात्रांत रंकाचा राव करून टाकणारें एक जबरदस्त साधन. हा मोहपाश तोडून टाकून, सत्याला, नीतीला स्मरून, वागणारा मात्र खरोखर धन्य होय. अशाप्रकारचा विवेक ज्याच्या हृदयांत सदैव जागृत आहे, न्याय—नीति यांच्या अपार थोरवीपुढें ज्याला आपल्या प्राणाची सुद्धां फारशी किंमत वाटत नाहीं, असा असाधारण पुतळा कुणीतरी ह्या जगांत जन्माला आला असेल काय? कदाचित् असल्यास न कळे ! पण माझ्या स्थितीवरून पाहतां नसेल व पुढेंही कुणी निपजणार नाहीं, असेंच मला वाटते ! असो, पण आतां हे विचार मुळींच कामाचे नाहींत. पंचप्राण हरण करण्याच्या इराद्यानें, घोर अरण्यांत वास्तव्य करून राहणाऱ्या वाघावर गोळी सोडून त्याला जखमी केल्यास. जसें त्याला अजिबात ठार करणें ह्या सारखें दुसरें गत्यंतर नाहीं, तद्वतच माझीही यावेळीं स्थिती झाली आहे! मागचा पुढचा कांहींएक विचार न करतां अधमपणानें अनायासें आलेली ही संपत्ती खुशाल बळकावून शिरक्यांना जखमी तर मी करून सोडलेच आहे

त्या मला आतां त्याचा त्या स्थितींतच शेवट झालेला पाहणें, याशिवाय उपाय नाहीं. गोष्ट होऊं नये ती होऊन चुकली, आतां ती भीतीनें अर्धवट सोडून देणें हें काम माझ्या हांतून कधींही होणें नाहीं; पण ह्या कामांत माझ्याशीं स्पर्धा करणारा असा माझाच मुलगा हरामखोर—त्यांच्यावरील प्रेमाकरतां तरफडतो आहे. जी गोष्ट मला मुळींच इष्ट नाहीं, त्या गोष्टीचा त्याला रात्रंदिवस सारखा निदिध्यास ! माझ्या दुष्मानाशीं सख्य ठेवून मी प्रत्यक्ष त्याचा बाप असतांना माझ्याशीं वैर संपादण्याचा त्याचा विचार ! ठीक आहे, चिंता नाहीं. याचें प्रायश्चित्त त्याला लवकरच भोगलें पाहिजे. माझ्याशीं—या जाधवरावाशीं गांठ आहे, हें तो जाणत नाहीं. ( समोर पाहून ) पण हा कोण तोच आला वाटतं. छे; हा गुलाब.

( गुलाब प्रवेश करतो. )

गुलाब, मदन नाहींना मग तुला काल भेटला ! त्याला अलीकडे बराच चळ लागला आहे. कारटा असा होता तरी कुठें ?

गुलाब— कुठें ह्मणजे काय ! होता, इथेंच होता. सगळीकडे शोधतां शोधतां अखेरीस त्या शिरक्यांच्या पोरीबरोबर गोष्टी करतांना त्याला मी विलासबागेंत पाहिला. तिच्याशिवाय त्याला कांहीं दिसत नाहीं की सुचत नाहीं, मग माझ्या सारख्याच्या सांगण्याकडे त्याचें लक्ष कुठून असणार ! आणखीं त्यांत मी लहान पडलों, तेव्हां मला सांगण्याचा खरोखर कांहींच अधिकार नाहीं. पण तिथला चाललेला प्रकार, व त्यांच्या आपसांतल्या कांहीं गोष्टी, ह्या ऐकून मात्र माझ्या मनाला अंमळ चमत्कारिकच वाटलं.

जा०—ह्मणजे काय ? काय त्यांच्या गोष्टी चालल्या

होत्या ? एवढें चमत्कारिक वाटण्यासारखें ते काय ह्मणत होते ?

गुलाब—अं: जाऊं द्या ते. ज्याच्या मनाला जसं बरं वाटलं तसं तो करतो झालं. ती गोष्ट आतां कुठपर्यंत मनावर घ्यायची. माझा वडील भाऊ असला तरी त्याची गणना अजून थोर माणसांत कांहीं होत नाहीं, तेव्हां त्याचे विचार प्रोक्त व परिपक्व दशेंतील कुठून असायचे ? करितां आपण तिकडे लक्षच देऊं नये झालं.

जाधवराव—गुलाब, काय तें स्पष्ट बोल. आजपर्यंत मी पुष्कळ हयगय केली, पण आतां—आजच्याआज ह्या गोष्टीचा मला काय तो निकाल करून टाकलाच पाहिजे. काय तो ह्मणाला ?

गुलाब—बाबा, पण हें मी काय सांगणार ! आह्मीं दोघेही लहान, तेव्हां तशीच चुकी माझ्याही हांतून होणार नाहीं ह्मणून कशावरून ? याकरितां ही गोष्ट तुह्मी मला न विचारितां, एखाद्या विश्वासनीय मनुष्याकडून किंवा प्रत्यक्ष त्याच्याच तोंडून काय तें समजून घ्यावं, ह्मणजे ठीक. तो मला आपला वैरी समजतो, अर्थात मलाही त्याचें वर्तन मुळींच पसंत नाहीं, तेव्हां अशा स्थितींत उंदराला मांजर साक्ष धरून खरा निवाडा कसा होणार ? छे. माझ्याच्यानें कांहीं तें सांगवत नाहीं व मी सांगूं नये हेंच योग्य. आपण तरी एकट्या माझ्याच बोलण्यावर काय ह्मणून विश्वास ठेवावा ?

जा०— नाहीं, नाहीं, असें उपयोगीं नाहीं. गुलाब, तुझ्याकडून अशी गोष्ट कधींही होणार नाहीं, याविषयीं तुझी मला पूर्ण खात्री आहे. सांग. एक घांव आणि दोन तुकडे एकदांचें होऊन जाऊं देत. तूं जर ही गोष्ट सांगणार

नाहींस–माझ्या ह्मणण्याला जर तूं मान देणार नाहींस, तर तूं माझा हा मोठाच अपराध करीत आहेस असं मी समजेन. नाहीं ही गोष्ट तुला सांगितलीच पाहिजे.

गुलाब०— आपल्याला पूर्णपणें माहीतच आहे, कीं आपल्या आज्ञेबाहेर मी आजपर्यंत कधींच वागलों नाहीं. तेव्हां आपली ही आज्ञा मला मान्य केलीच पाहीजे. काय सांगू ! शिरक्यांच्या त्या टारगट पोरीवर कुणाचाच दाब न राहिल्या कारणानें, ती अलीकडे फारच स्वैरवर्तन करणारी झाली आहे. आपल्या मदनावर तिनें खरोखर कांहीं तरी जबरदस्त मोहनी केली असली पाहिजे; यांत शंका नाहीं. नाहींतर मदनासारख्या सुशिक्षित, पितृआज्ञापालनतत्पर, सुशील, सुस्वभावाच्या माणसाच्या तोंडून अशाप्रकारचे शब्द कधीं स्वप्नांत सुद्धां निघाले नसते ! खरोखर धन्य असो अशा स्त्रियांची !

जा०—( रागानें हात आपटून ) पण अशाप्रकारचे ह्मणजे कसे–गुलाब असें संदिग्ध भाषण करून माझी जिज्ञासा–माझा राग अनावर करण्यांत तुला काय अधिक वाटतं ?

गुलाब०—छे तसा माझा मुळींच हेतू नाहीं. बाबा, एक क्षणभरही घरीं न राहतां तो सबंध दिवसाचे दिवस तिच्या सहवासांत घालवितो, हें आपल्याला माहीत आहेच. तिच्यापुढें त्याला, आपल्या घराची, आपल्या संपत्तीची, आपल्या नांवलौकिकाची,आपल्या कुलाची, आपल्या नातलगाची-कशाचीच चाड नाहींशी झाली आहे. फार काय पण, तिच्याकरतां तो आपल्या प्रत्यक्ष बापाला सुद्धां-पण नको ते विचार !

जा०–( रागानें चवताळून ) काय ? प्रत्यक्ष मला-आपल्या बापाला सुद्धां—

गुलाब—( मध्येंच ) पण, तो आलाच बाबा, आपण अंमळ शांत होऊनच काय तें विचारून घ्यावं. ( स्वगत ) स्वारीची तब्येत तर खूब गरम झाली आहे, तेव्हां आजच्या ह्या उडणाऱ्या खडाजंगीला बरेंच महत्व येईल.

( मदन प्रवेश करतो. )

जा०—मदना, काल तुला घरीं येण्याला किती उशीर झाला होता, याची आहे का कांहीं आठवण ? रात्रीचा फार वेळ बाहेर न राहण्याविषयीं मी तुला शंभरदां बजावून सांगितलें आहे; पण तूं माझ्या सांगण्याकडे मुद्दाम दुर्लक्ष्य करून आपलाच हेका नेहमीं चालवितोस हें चांगलें नव्हे. तूं इतका बेशरमपणा स्विकारितोपर्यंत तुला बोलण्याचा मला प्रसंग येईल, असं तुझ्या पूर्वीच्या चांगल्या स्वभावावरून मला कधींहीं वाटलं नव्हतं.

मदन-( शांतपणानें ) हो, झाला खरा थोडा उशीर, आणि मला त्याबद्दल फार वाईटही वाटतें. ह्यापुढें कोणतेंही काम वेळेवरच करून टाकण्याचा मी मनापासून प्रयत्न करीन. कारण काम हलकें असो कीं महत्त्वाचं असो, तें करून टाकण्याची वेळ निघून गेली कीं त्या त्या मानानें मनुष्याला मागाहून कमीजास्त पश्चात्ताप जरूर होतो.

जाधवराव—ह्या तुझ्या भाषणानें माझ्या मनाचें खरें समाधान कधींही व्हावयाचें नाहीं. तुझ्या खऱ्याखोट्याकडे लक्ष देऊन तुझ्या बऱ्यावाईटांत हात घालण्याचा मला पूर्ण अधिकार आहे, पण तो तूं स्वतःला शहाणा समजून जाणूं नयेस ही फारच आश्चर्याची गोष्ट. मदना, माझ्या सांगणाच्या अगदीं उलट वागण्याचा अलीकडे तूं निश्चयच—

म०—मुळींच नाहीं. पित्याच्या आज्ञेप्रमाणें पुत्राचें वर्तन

असलें पाहिजे, ही गोष्ट मला शिरसा मान्य आहे; पण नुसत्या तोंडदेखल्या वर्तनाचा मला मनापासून तिटकारा येतो. सर्वांत मुख्य गोष्ट—मनुष्याचें अंतःकरण चांगलें शुद्ध असणें ही होय, तोंडावर गोड गोड बोलून आंतून बेइमानपणाची कृती आचरणें हें मला मुळींच साधत नाहीं, व मला आवडतही नाहीं. त्यामुळें कदाचित् मी आपला आज्ञाभंग करतों, असं आपल्याला वाटत असेल, तर नाइलाजाची गोष्ट आहे.

जा०—मदन, ह्या जगांत राहून जे मी इतके दिवस काढले, त्या मला मनुष्यस्वभाव कसा असतो याची परीक्षा नाहीं, असं का तुला वाटतं ? तूं आणखीं गुलाब, ह्या दोघांमध्यें तुझा हट्टी स्वभाव, आपल्याच मनाप्रमाणें नेहमीं घडवून आणण्याकरितां आपल्या आइबापांच्या झालेल्या अपमानाबद्दल बेपर्वाई, मनाचा उच्छृंखलपणा, आणि तिरसट भाषणशैली मला जास्त स्पष्ट दिसून येते. गुलाब माझी आज्ञा पाळण्याला कधीं चुकला असेल, असं कांहीं मला आठवत नाहीं; आणि ह्मणूनच त्याच्या बऱ्यावाइटाविषयीं नेहमीं मी इच्छा करावी यांत काय नवल ?

म०—त्रः मग फारच आनंदाची गोष्ट. आपल्या मनाप्रमाणेंच त्याची वर्तणूक नेहमीं रहावी असें मी इच्छितो; व तुमच्या सांगण्यावरून ती तशी आहे, हें ऐकून मला फार संतोष वाटतो; पण इतराशीं तसें वर्तन-प्रत्यक्ष माझ्याशीं कधीं चुकून गोड शब्द तो बोलल्याचें मला आठवत नाहीं. आपल्या मुलांच्या बऱ्याविषयीं जर नेहमीं आपली इच्छा जागृत आहे, तर मी करीत आहे ती गोष्ट तुह्मांला इतकी नापसंत मुळींच वाटली

नसती. तुह्मी माझ्या कृतीला असा उघडपणें दोष कधींही दिला नसता !

जा०—अस्सं एकूण तूं सुखांत दिवस कधींही न घाल-वितां देशोधडीस लागावास हीच माझी मनापासूनची इच्छा, नाहींका? टीक आहे. (रागानें) आजपर्यंत जरी माझ्या मनांत हा विचार कधींही आला नसला, तरी तो ह्यापुढें खास येईल. तुझें फुटक नशीब तुला आनंदांत नांदु देत नाहीं हेंच खरें. मदन, मला पसंत वाटत नाहीं, अशी कोणची चांगली गोष्ट तुझ्या हांतून घडली ? त्या भिकारडया मालतीकडे तूं लक्ष देतोस, ही अगदीं जगमान्य गोष्ट तूं करतोस, असं का तुला वाटतं ? असं असेल तर खरोखरच तुझं दुर्दैव समजलं पाहिजे; त्यापेक्षां आपली कुसुम तुला न आवडण्यासारखें तिच्यांत तुला काय व्यंग दिसलं ? मला वाटतं, कीं कुसुमचा व तुझा विवाह, यासारखी दुसरी श्रेयस्कर गोष्ट कोणतीही होणार नाहीं; आणि हेंच तुला विचारण्याचा आज माझा निश्चय झाला आहे. ह्या गोष्टीचा आज मला काय तो निकाल करून टाकलाच पाहिजे.

म०—माझ्या दुर्दैवाचा जर कळस होणार असेल तरच आपण ह्मणतां तशी गोष्ट घडून येईल. कुसुममध्यें कांहीं नांव ठेवण्याला जागा आहे, असं माझं मुळींच ह्मणणं नाहीं. ती सुद्धां फारच सुंदर, मोहक व सुशील स्वभावाची आहे, पण माझें जर तिच्यावर प्रेम नाहीं, तर त्याला मी काय करणार ! माझ्या प्रेमाच्या योग्य मोबदला एका मालती शिवाय दुसरा कुठं मिळेल असं मला मुळींच वाटत नाहीं. तिच्याठायीं माझें खरें प्रेम आहे. माझें

तनमनधन सर्व तिच्यांत गुंतलें आहे. खरें प्रेम म्हणजे एकतर लवकर जडत नाहीं, व जडलं तर तिथून नाहींसें होणें ही गोष्ट अगदींच अशक्य. बळजबरीनें देह वेगळे करतां येतील, पण एकत्र झालेले प्राण अलग करणें म्हणजे दोहोंचाही नाश करणें—कालाच्या जबरदस्त तडाख्यांत आपण होऊन विनाकारण ढकलणें होय. तशीच स्थिती आमची होऊं देणं, हें आपल्याला—माझ्या हिताविषयीं अहोरात्र झटण्याची इच्छा करणाऱ्या तुम्हाला—माझे वडलांना, चांगलं नाहीं. शरीरावर व्याधी पेक्षां आधीचा परिणाम फार भयंकर होत असतो. हा प्रेमपाश तोडून टाकल्यास ह्या माझ्या देहाला होणाऱ्या असह्य वेदना नाहींशा करण्याचें सामर्थ्य कुसुमच्या अंगांत खात्रीनें नाहीं; शिवाय ती व मी म्हणजे बरेच अंशी विचार केला असतां, एकमेकांना बहीणभावंडांसारखी आहोंत, तेव्हां याचा आपण चांगला विचार कराल अशी मला फार आशा आहे. मनांत बरेच दिवस ही गोष्ट सलत न राहूं देतां, आज अनायासें संधी आली म्हणून जें कांहीं खरें खरें वर्तमान मला सांगायचें तें मी आपल्याला कळवून चुकलोंच आहे. ह्या माझ्या स्पष्ट बोलण्याबद्दल मला क्षमा असावी.

जा०—यांत कांहींच अर्थ नाहीं. कुसुमच्या एका पांसगाला सुधां तिची योग्यता लागायची नाहीं. मी तुला निक्षून सांगतों कीं मालतीचा व तुझा विवाह मी आपल्या ह्या डोळ्यांनीं कधींही पाहणार नाहीं. माझ्या म्हणण्याप्रमाणें तुला कुसुमबरोबर लग्न केलेंच पाहिजे.

म०—पण मला वाटते, विवाह म्हणजे कांहीं लहानसहान गोष्ट नव्हे. ह्या जन्माच्या गांठी आहेत. मनुष्याचा

पुढील आयुष्यक्रम सुखकर किंवा दुःखद होणं, हें सर्वस्वी त्यावरच अवलंबून आहे, तेव्हां ह्या गोष्टींत तुमच्यापेक्षां मला माझ्याच विचारांना जास्त महत्व देणें रास्त आहे. मी कुणाचेंही न ऐकतां मालती बरोबरच लग्न करणार ! तुमचा तरी ह्या बाबतींत माझ्या मर्जीविरुद्ध एवढा हट्ट कां असावा, हें मला कांहींच समजत नाहीं.

जा०—मदन, सारासार विचारांना तूं आपल्या डोक्यांत कांहींच जागा ठेविली नहींस ! इतका बेफाम होऊं नकोस. तूं कुठें आहेस, कशा स्थितींत आहेस याचाही काहीं विचार कर. कुसुमबरोबर तुझें लग्न झाल्यास, तूं किती सुखी होशील, केवढी संपत्ती तुझ्या वाटयाला येईल, तुझा लोकांत केवढा मान राहील, याची तुला कल्पना तरी आहे का ? असें असून त्या हीन कुलांतल्या पोरीकरतां तरफड-तोस, हे तुला भिकेचेच डोहाळे आठवताहेत ह्मटलं पाहिजे. त्यांच्या जन्मभर त्यांना स्वप्नांत सुद्धां इतकी संपत्ती दिसणार नाहीं.

म०--संपत्ती--संपत्ती ह्मणजे काय ? खरे कष्ट करून मिळविलेल्या पैशापासून जितकें सौख्य होतें, तो शेवटपर्यंत आपल्या जितका उपयोगी पडतो, त्यापासून मनाला जें समाधान वाटतें, तें समाधान, तें सौख्य, आयत्या मिळा-लेल्या किंवा अधमपणाची कृती करून दुसऱ्याला सफई बुडवून बळकावलेल्या पैशापासून मला कधींही होणार नाहीं. ( जाधवरावाचा चेहरा एकदम उतरून जाऊन मुद्रा कावरीबा-वरी होते. मदनाच्या ती गोष्ट लक्ष्यांत येते. ) अशारितीनें कुबेराची जरी संपत्ती मिळाली तरी त्याचा उपभोग घेत राहणें, ह्मणजे शुद्ध नरकवास आहे, असें मी समजतों.

खऱ्या सुखापुढें मला ह्या पैशाची मुळींच चाढ नाहीं. शिवाय हे जरी अपला जन्म दारिद्र्यावस्थेंत काढताहेत, तरी ते थोर कुळांतले आहेत, ही गोष्ट आपल्याला कबूल केलीच पाहिजे.

माधव-मदन, ह्या सर्व जगांतल्या चाललेल्या खटपटी, सर्व उलाढाली, केवळ पैशाकरितां असून तुला त्याची कांहींच किंमत वाटत नाहीं अं ?

मदन— अजूनपर्यंत वाटतें आहे, पण आपल्या ह्मणण्याप्रमाणें कदाचित् ही अशी आयती संपत्ती हातांत आल्यावर वाटेल कीं नाहीं याची शंकाच आहे. स्वतः मेहनत करून पैसा मिळविल्याशिवाय मनुष्याला त्याची खरी किंमत कधींच कळत नाहीं. हें तत्व आपण विसरूं नये. वाईट रीतीनें मिळविलेला पैसा वाईट मार्गानेंच जाणार खास.

जा०— तूं पक्का माथेफिरू आहेस. कितीही तुला सांगितलें तरी त्याचा कांहींच उपयोग व्हावयाचा नाहीं, हें मला माहीत आहे.

म०—साव असतांना सुद्धां चोराला जसा तो चोरच दिसतो, किंवा वाटेल तें साहस करून द्रव्य मिळविण्यासाठीं हापापलेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें द्रव्याशिवाय, कांहींच दिसत नाहीं, तद्वत मी हें सर्व खरें सांगत असतांना त्याजवर आपला मुळींच विश्वास जडू नये, ह्मणजे माझें दुर्दैवच ह्मणावयाचें !

जा०—( आवेशानें ) बस्स, एक गोष्ट. ह्या सतरा पंचाइतीशीं मला जरूर नाहीं. तुला माझ्या ह्मटल्याप्रमाणें वागायचें आहे कीं नाहीं ?

म—( निश्चयानें ) मुळींच नाहीं.

जा०—ध्यानांत ठेव, माझें जर तूं ऐकणार नाहींस तर

आजच्या आज तुला हें माझें घर सोडून गेलेंच पाहिजे. मी आपल्या सर्व संपत्तीचा मालक एकट्या गुलाबला करीन व तुला त्यांतील एक कपर्दिकही न मिळतां सारा जन्म पश्चात्तापांत घालवावा लागेल याचा पूर्ण विचार कर. हा तरुणपणांतला अविचार पुढें तुला खात्रीनें जाचेल.

म०— याचा विचार मी पूर्वीच केला आहे. आपल्या आज्ञेप्रमाणें आज निघण्याची तयारी करतों. पैशा करतां रडत बसणारा हा मदन खास नव्हे; आणि कदाचित् मला-पश्चात्ताप झालाच तर तो माझा मलाच भोगला पाहिजे, त्याबद्दल आपल्याला काळजी नको. माझा जन्म निवळ दुःखांतच जावा, असें जर माझ्या दैवीं लिहिलें असेल, तर त्याला तुम्ही तरी काय करणार ! येतों तर आतां, आपली रजा घेतों. ( उठून चालूं लागतो ) जातांना भेटायला येईनच.

जा०—मदन, आणखी एकदां मी तुला विचारतों, माझं नाहींना तुला ऐकायचं ?

म०—नाहीं, नाहीं. माझ्या सौख्याआड येण्याचा जर तुमचा मनापासूनचा प्रयत्न, तर तुमच्या ह्मणण्याप्रमाणें मी कधींही ऐकणार नाहीं. हा पहा मी चाललों.

( मदन निघून जातो. )

जा०—( निराशेनें ) हाय हाय ! ! काय हें माझें जीवित ! माझी एवढी संपत्ति, एवढा माझा अधिकार, पण लोकांना मी तुछ भासूं लागलों ! माझ्या शब्दात वजन मुळींच राहीलें नाहीं ! प्रत्यक्ष माझ्या पोटचा मुलगा—माझेंच ऐकेनासा झाला !

गुलाब— ( धाडकन मागें पडलेल्या जाधवरावास

सांवरून ) बाबा, बाबा, हें काय हें असं काय करतां. अरेरे ! ! ( वारा घालतो. )

( पडदा पडतो. )

---

अंक १ ला समाप्त.

---

# अंक २ रा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—शिर्क्यांच्या वाड्यांतील कुसुमचा दिवाणखाना.

( कुसुम आणि मदन प्रवेश करतात. )

कुसुम—( सद्गदित स्वरानें ) हाय हाय मदन, अखेरीस या थरावर गोष्ट आली ना ? माझ्याकरितां, केवळ ह्या हत-भागीकरितां आपल्या सुकुमार देहाला विदेशीचे कष्ट भोगण्याची पाळी !

मदन—( तिचा हात धरून ) नाहीं, नाहीं, कुसुम यांत तुझा मुळींच संबंध नाहीं. एक पैशाची किंमत न जाणणारा, व दुसरा केवळ पैशाकरतांच आपलें जीवित धारण करून राहणारा, ह्या दोघांचें सख्य कधींहि व्हायचें नाहीं. शिरक्यांच्या मालतीवर मी प्रेम करतों, हाच काय तो माझ्या हांतून झालेला घोर अपराध, अपारसंपत्तीवरील माझा हक्क अजिबात नाहींसा करणारी हीच कायती एक गोष्ट. जाधवराव शिरक्यांच्या पवित्र कुळाला काळीमा आणण्यासारखें हेंच काय तें माझ्या हांतून घडलेलें अविचारीपणाचें वर्तन, व ह्या संसारांत माझा खरा मार्ग दाखविण्याला कारणीभूत झालेला हाच तो अनावर मनोविकार ! कुसुम, शिरके आपले अगदीं

जवळचे नातेवाईक असून सुद्धां त्यांचा नुसता नामोच्चार बाबांच्या मनोवृत्ती खवळून टाकण्याला, त्यांचा शांतस्वभाव, त्यांच्या मनांत वास्तव्य करीत असलेलें पुत्रवात्सल्य पार मावळून टाकण्याला पुरे आहे. मग त्यांपैकीं एकीवर प्रेम, ह्यांसारखें घडलेलें माझ्याहातचें अनन्वित कृत्य मला या भयंकर शिक्षेला पात्र करील यांत काय नवल ?

कुसुम—लहान असतां आपण एकमेकांवर प्रीती करीत होतों, हाच विचार बाबांच्या मनांत पक्का बिंबून जाऊन, त्या आपल्या प्रेमाला निराळी दिशा लागून आपला विवाह व्हावा, असेंच त्यांना अलीकडे वाटूं लागलं होतं; पण ज्या गोष्टी कधींही होणाऱ्या नाहींत त्या गोष्टींचा विचार करून क्षुल्लक कारणाकरतां सर्व कुळाचा विध्वंस करण्याला उद्युक्त होणं, यांत काय अर्थ ! मालतीचा व तुझा विवाह, कोणत्याही रीतीनें पाहिलें असतां अनिष्टकारक नव्हता; उलट हा संबंध घडवून आणून, थोर पण दुर्दैवाच्या प्रतीकूलतेमुळे हालअपेष्टांत दिवस काढणाऱ्या अशा आपल्याच पैकीं एका घराण्याला उर्जितावस्था प्राप्त करून देण्याचें श्रेय पदरांत पडलें असतें. त्यांच्या ह्या कृतीनें चहूंकडे आनंदिआनंद झाला असतां. तें सोडून देऊन, स्वर्ग सुखालाही तुच्छ मानून ऐश्वर्यशिखरावर वास्तव्य करणाऱ्या गजबजलेल्या घराण्यांतील मुख्य कारणीभूत असलेलं प्रेमरूपी बीज खणून काढून, कलहाग्नीनें तें पेटवून, त्यापासून उत्पन्न झालेल्या, क्षणार्धांत होरपळून काढणाऱ्या भयंकर ज्वालांत आपल्यासुद्धां बहुतेकांची आहुती देऊन अशारीतीनें जिकडे तिकडे कहर माजविण्यांत त्यांना विशेष काय भूषण वाटलं !

मदन–त्यांत त्यांना तरी दूषणें देण्यांत काय अर्थ ? हा सर्व अपराध मी आपल्या स्वतःकडेस लावून घेतला आहे. मीच ह्या सर्वांना कारण झालों. मालतीवर जर मी प्रेम केलं नसतं, तिच्या त्या सुंदर, सुकुमार, मोहक चेहऱ्याला, तिच्या सुस्वभावाला, निष्कपट वर्तनाला तिच्या त्या दीन स्थितीची भर पडून जास्तच कळवळ आणणारा असा हा प्रेमपाश तोडून जर मला तत्क्षणीं वेगळं होतां आलं असतं, तर आज घडून आलेला प्रकार, शिरक्यांचा नामोच्चार ऐकून उसळलेले बाबांच्या डोक्यांतील हें वेड खात्रीनें नाहींसें झालें असतें; पण अग्नीवर ज्याप्रमाणें तैलवृष्टि व्हावी, किंवा मरणोन्मुख झालेल्या मनुष्याला ज्याप्रमाणें कालकूट वीष प्यायला द्यावें, त्याप्रमाणेंच त्यांच्याशीं हें माझें वर्तन झालें आहे. कुसुम, ही गोष्ट एवढ्या विकोपाला जाईल असं मलाही वाटलं नव्हतं, पण निरुपाय आहे. ठरल्याप्रमाणें आज मला निघण्याची तयारी केलीच पाहिजे. तुला ही गोष्ट कळवून तुझी भेट घ्यायला मी आलों आहे.

कुसुम– पण मदन, जवळपास मायेचं माणूस कुणीही नाहीं, अशा परक्या ठिकाणीं भर उन्हांत हवेंत काबाडकष्ट करण्याला उद्युक्त होण्याइतका आपल्या मनाचा निश्चय तुझ्याच्यानें करवला तरी कसा ! दुखणाईत झाल्यास तुला औषधपाणी तरी कोण देईल. कोण तुला वेळेवर जेवायला वाढील. त्रस्त झालेल्या तुझ्या मनाचें शांतवन करणारें तिथें तुला कोण मिळणार ! कधीं संवय नसलेल्या मनुष्याला असले प्रसंग ह्मणजे फारच कठीण असतात; त्यांत आजपर्यंतचं तुझं आयुष्य ह्मणजे निव्वळ सुखांत गेलेलं. एवढेंसें सुद्धां श्रम करण्याची तुला संवय नाहीं,

मग तुझा तिथें कसा निभाव लागणार ! याचा मला मोठा विचार येऊन पडला आहे.

मदन—( डोळ्यांत अश्रु आणून ) कुसुम, काय सांगूं ! आईच्या पश्चात असले प्रेमळ शब्द फक्त तुझ्याच तोंडून उच्चारलेले आज मला ऐकायला मिळाले. हाय हाय ! ती माउली हें जग सोडून चालती झाली, तेव्हांच माझ्या सौख्याला कायमचा फांटा मिळाला असें मी समजतों. माझ्याबद्दल काळजी करणारें मनुष्य तिच्या पश्चांत कुणीही उरलें नाहीं. सुखाची गोष्ट घडून आल्यास माझा मीच आनंद मानावा, व दुःख झाल्यास मीच स्वतःशीं रडत बसून त्याचा परिहार करण्याचा यत्न करावा, यापरतां दुसरा कांहींच उपाय राहिला नाहीं. ती गेली तेव्हांच, माझी सर्व संपत्ती, माझा मान, माझ्या शरीरांतील नाजुकपणा, सर्व कांहीं जाऊन मी अगदीं साधारण–पक्का रानवट बनलों. जगांत उरलेलें आपलें आयुष्य, कुणाचाही आश्रय न घेतां आपल्याच अंगच्या बलावर कंठण्याइतकं धैर्य तेव्हांपासून माझ्या देहांत आलें, आणि त्याप्रमाणें वागणें हाच एक मार्ग आतां मला उरला आहे. कुसुम, यांत तू आपल्या मनाला वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ ! परमेश्वराची कृपा असल्यावर मी सध्यां आहें याहून सुद्धां जास्त सुखी होईन, नाहीं कशा-वरून ?

कुसुम— मदन, नाहीं, नाहीं, आपली स्थिति फारच शोचनीय झाली आहे, यांत शंका नाहीं. कांहींच उपाय चालेनासा झाला, ह्मणजे कसेंतरी आपल्या मनाचें समाधान मानून घ्यावें लागतें, यांतलाच तुझ्या ह्मणण्याचा अर्थ. मातृ-हीन झालेल्या अनाथ पोरांचा ज्याच्या माथीं संभाळ असे

आपले बाबा–त्यांची स्थिती ही अशाप्रकारची, व दादासाहेब काय विचारतां त्यांचा कांहीं निराळाच प्रकार, त्यांना स्वतः-शिवाय दुसऱ्या कुणाचीच काळजी नाहीं. मदन, तूं पुरुष आहेस, वाटेल त्या रीतीनें तूं आपलें पोट भरशील, पण अशा ठिकाणीं अशांच्या सहवासांत मीं आपला काळ कसा कंठावा ! माझी कांहीं धडगत दिसत नाहीं !

मदन— काय हे विचार ! कुसुम खरं पाहिले असतां तुला याविषयीं कांहींच काळजी करायला नको. वाटेल तसा जरी प्रसंग आला तरी त्यांतून मोठ्या हिंमतीनें निभावून नेतील, अशा आपल्या अंगच्या अनेक सद्गुणांनीं ज्यानें जगांत नांव कमाविलें आहे, जो दुसऱ्यावर अवलंबून राहण्याच्या दुःसह स्थितीपासून अगदीं निर्मुक्त आहे, केवळ ज्याच्याकडे पाहून घरांतील माणसांना आपली अत्यंत गरीबीची स्थिति, पण स्वर्गसुखाहूनही ज्यास्त सुखकर वाटते अशा सद्गुणांनीं युक्त जो शिरक्यांचा विलास, याचें तुझ्या ठायीं निष्कपट प्रेम आहे. तो तुला आपल्या प्राणापलीकडे जपेल. कुसुम, या ठिकाणीं तूं मुकाट्यानें हाल सहन करून दिवस काढतेस, एवढें त्याला कळलें कीं पुरे तो तुला इथें एक क्षणभरही राहूं देणार नाहीं. तूं कांहींएक काळजी करूं नकोस. तुह्मां दोघांचें प्रेम जडवून देण्यांत ईश्वराचा तुह्मा दोघांनांहीं अत्यंत सुखी करण्याचाच विचार दिसतो. आमच्या सारखें एकमेकांच्या अक्षय दुःखाला कारणीभूत होणारें तुमचें प्रेम नाहीं, यांतच तूं आनंद मान.

कुसुम– हे तुझे शब्द माझ्या मनाला खरोखर आनंद देतात; पण तो आनंद ह्मणजे अक्षयीचा आनंद होईल कां ?

मदन—खात्रीनें होईल. मला त्यांत मुळींच शंका वाटत

नाहीं, व तूंही आपलें मन त्याविषयीं अगदीं निःशंक ठेव. जातांना विलासाला तुझ्याविषयीं सांगून गेल्याशिवाय मी राहणार नाहीं.

कुसुम—मी आपलं प्रेम—आपलं सर्वस्व त्यांनाच वाहिलं आहे, ही गोष्ट बाबांना अजूनपर्यंत माहीत नाहीं, व गुलाबला वर याची कांहींच वार्ता नाहीं. केवळ तुझा पूर्ण भरंवसा जाणून तुझ्याजवळ मात्र ही गोष्ट मी उघड केली आहे. त्यांना कळवायला माझें मनच धजत नाहीं.

मदन—आणि हेंच चांगलें. तुझी इथून सुखरूपपणें सुटका झाली अशी तुझ्या मनाची खात्री झाल्याशिवाय ही गोष्ट कुणाही परक्यांना न कळवितां गुप्त ठेवणेंच श्रेयस्कर, असें मला वाटतें. कुसुम, वेळ झाला आतां. मला राहण्यांत अर्थ नाहीं, मला आतां गेलंच पाहिजे. माझ्याविषयीं तूं काळजी अगदीं करूं नकोस. मी जो इथून दृढनिश्चय करून निघालों आहें, तो मी आपल्या कुळाला साजेसा अधिकार, मान, आणि पैसा मिळवून आणल्याशिवाय कधींही परत येणार नाहीं; आणि तोंही अगदीं थोडक्या काळांत—जाधवरावाच्या घराण्यात घडून आलेल्या ह्या अघटित गोष्टीचा लोकांना पूर्णपणें विसरसुद्धां पडणार नाहीं—ती गोष्ट त्यांच्या पक्की स्मरणांत आहे, तोंपर्यंत आह्मां दोघांच्या स्थितीची तुलना करण्याचा त्यांना प्रसंग आणीन, तरच नांवाचा मदन होईन.

कुसुम—ह्याशिवाय माझें परमेश्वराजवळ दुसरें मागणें काय असणार ! तूं गेल्यावर मालतीची भेट घेऊन तिच्या मनाचें मी शांतवन करीन. तूं निघून गेल्याबद्दल तिच्या मनाला वाईट वाटूं देणार नाहीं.

मदन-हे तुझे मजवर फार उपकार होतील. मी आतां जातों, आत्याबाईंना माझ्याबद्दल सांग. त्यांची भेट घ्यायला मला आतां अवकाश नाहीं.

कुसुम-मदन, अंमळ थांब. ( आंत जाऊन एक पैशांनीं भरलेली पिशवी आणून मदनाला देते ) ही घे. तुझ्या गुणांचें चीज होऊन तुला पैसे मिळूं लागे तोंपर्यंत ही तुझ्या पुष्कळ उपयोगी पडेल. याहून मी जास्त काय देणार !

मदन—माझ्या पराक्रमाविषयीं एकाकी तुला खात्री पटायची नाहीं, हें मी समजून आहे. असो, तुझी प्रेमाची देणगी ह्मणून मी आनंदानें इचा स्वीकार करतों. ( पिशवी घेतो. ) बहुतेक हा पैसा संपण्याच्या अगोदरच मी पुष्कळ मिळवूं लागेन अशी माझ्या मनाची खात्री आहे पण हें तूं ध्यानांत ठेव, ह्या घरांत, पैशाची मला गरज लागली तर ती मी तुझ्यापासून मागवून घेईन, सुखदुःखाच्या गोष्टींचा विचार फक्त तुझ्याजवळच काय तो मी करीन, प्रेमानें मला भेट घ्यावी अशी इच्छा झाल्यास ती मी तुझी घेईन, आणि माझ्याबद्दल खरी कळकळ बाळगणारें शिंद्यांच्या घराण्यांत जर कुणी असेल तर फक्त तूं एक आहेस, असेंच मी निरंतर समजेन, येतों मी आतां.

कुसुम— ठीक आहे. ( त्याला पोंचविण्याला दरवाज्यापर्यंत जाते ) मदन, प्रवासांत आपल्या जिवाला फार जपून वाग, खुशालीचें वरचवर पत्र पाठवीत ऐस. ये आतां.

मदन-( जातांना थांबून मागें वळून ) त्याविषयीं तूं निर्धास्त रहा. माझी दररोजची हकीकत तुला कळेल अशी मी तजवीज ठेवीन. जा तूं जातां.

( मदन निघून जातो. )

कुसुम--( मदन दिसेनासा होईतोंपर्यंत त्याजकडे पहात रहाते ) गेला, अगदीं दिसेनासा झाला. नावाला जन्म मात्र मोठ्या श्रीमंत कुलांत, पण कपाळीं सौख्य असं एक दिवस सुद्धां लिहिलेलं नाहीं. अखेरीस घरांतून निघून जाऊन, गेला दिवस तो आपला, उद्यांचं कसं होईल, इथपर्यंत मजल आली. ह्या सर्व गोष्टींना कारण काय तर पैसा. शिरके श्रीमंत नाहींत ह्मणून तिथली मुलगी करायची नाहीं, हा बाबांचा निश्चय. त्यांना जिकडे तिकडे श्रीमंती आणि पैसा दिसतोय. पैशामुळें मनुष्याच्या सुखदुःखाची, त्याच्या अंगच्या इतर अनेक सद्गुणांची, उच्चकुलाची, कशाचीही ते पर्वा करीत नाहींत, फार काय, पण जनापवादाची, नांवलौकिकाची, आपल्या पोटच्या पोरांची सुद्धां त्यांना काळजी नाहीं. पैशा-करितां आपल्या पोटच्या गोळ्यांचा नाश करण्याला उद्युक्त होणारे हे मेले असले बाप, जगांत क्वचितच आढळतील आणि कदाचित असलेच तर त्यांना बाप असें ह्मणतां येणार नाहीं. पण काय असेल तें असो, पैसा जरी मुख्य हेतु आहे; तरी त्यांत शिरके ह्या नांवांत कांहीं विलक्षण जादु भरलेली आहे खास ! त्यांच्या आंचरणावरून पाहतां जगांत अत्यंत भीतिदायक तिरस्करणीय, असं हेंच एक नांव त्यांना दिसते. मालती आणखी ( किंचित घोंटाळून ) विलास, हे जर शिरके हें नांव धारण करून नसते, तर त्यांच्या विषयीं जाधवराव शिंद्यांना— ह्या पैशाकरतां अहोरात्र तरफडणाऱ्या बाबांच्या सुद्धां मनांत, प्रेम आणि आदरभाव उत्पन्न झाला असतां. ज्यांच्या गुणाबद्दल आज सर्व कांचनपूर वाखाणणी करीत आहे, ते मनुष्य कोटींत गणना असणाऱ्या, सारासार विचा-

रानें चांगलें कोणचं आणि वाईट कोणचं हें जाणूं शकणाऱ्या सुख, दुःख, लोभ, प्रेम, राग, मत्सर, आनंद, तिरस्कार, इत्यादि सर्व विकारांना इतरांप्रमाणेंच वश झालेल्या एकट्या जाधवरावांनाच इतकें अप्रिय कधींही झालें नसते ! पैसा नाहीं, ह्मणजे कांहीं नाहीं, असं जर केवळ त्यांना वाटलं असतं, तर आनंदराव पवारांच्या त्या माधवाबरोबर माझं लगीन करून देण्याचा त्यांचा निश्चयच झाला नसता. पवारांची घरची स्थिति ह्मणजे शिरक्यांच्या मालिकेंत बसविण्यासारखीच होती. नाहीं, नाहीं. त्याचें कारण हें नव्हें. शिरक्यांचें नांव ऐकतांक्षणींच बाबांच्या आंगावर जो शहारून फांटा उभा रहातो, त्याचें कारण त्यांची दीन स्थिती खास नव्हे. कांहीं निराळयाच कारणावरून मदनमालती यांचा विवाहप्रसंग घडवून आणण्याला त्यांचें मन धजत नाहीं. पण कांहींहीं असो, सर्वस्वाला आंचवला जाऊन एखाद्या मजुराप्रमाणें काबाडकष्ट करून मदनानें आपला उदरनिर्वाह करीत रहावं, हा त्याचा अखेर परिणाम झाला ! आणि माझी स्थिति तरी काय आहे ! विलासाबरोबर सारा जन्म आनंदात काढण्याच्या भावी सुखदस्थितीचें अहोरात्र विचार सारखे मनांत बाळगून, अशा दुःखमय परिस्थितींत आनंद मानीत असणाऱ्या माझें लगीन त्या—कर्मचांडाल गुलाबाबरोबर करून टाकण्याचा बाबांचा निश्चय ! नको, नको, हें ऐकण्यापेक्षां—हें सहन करण्यापेक्षां सहनशीलतेच्या मर्यादेबाहेरचे असे वाटेल ते हाल पुरवले ! त्या अधमाचा सहवास ह्मणजे मृत्यूची गदा आहे. जिवंतपणींच्या घोर यमयातना आहेत. त्याच्या निंद्य, अत्यंत क्रूर, मत्सरी स्वभावाचें वर्णन माझ्या कानीं पडल्यापासून, त्या नरपशूचें दर्शन सुद्धां—

( इतक्यांत गुलाब प्रवेश करतो. )

गुलाब—कसं काय चाललं आहे ? जेवणखाण बहुतेक आटपलंच असेल. ( जवळ जाऊन दचकून मागें सरतो. ) अं: हें काय ! प्रकृती ठीक नाहीं वाटतें ?

कुसुम—( त्याला पहातांच दचकते. दुःखानें स्वतःशीं ) नांव काढतांच यमस्वरूपी चांडाळ समोर येऊन उभा राहिला. आधींच मनाला होरपळून टाकीत असलेल्या दुःखाचा आतां खास कडेलोट होणार ! ( उघड ) नाहीं, अंमळ प्रकृति अस्वस्थ आहे.

गुलाब—पण एकाकीं अशी प्रकृती अस्वस्थ व्हायला काय कारण झाले बोवा ! डोकं बिकं दुखत असल्यास त्यावर एक अगदीं रामबाण औषध मजजवळ आहे. घेतलं नाहीं तोंच हटकून गूण ! ह्या बाबतींत इतर कित्येक निष्काळजी माणसांसारखी हयगय करणारा मी नव्हें. जाऊन आणतों हवेंतर. हो, कुबेराला पैशाची गरज, याचा अर्थ काय ?

कुसुम—जा, पण कांहीं एक आणूं नकोस, व तूंही परत येऊं नकोस. माझ्या ह्या अस्वस्थतेला औषध ह्मणजे एकांत—इतर माणसांचा फाजील त्रास अगदीं नको.

गुलाब ( लोचटपणानें ) हं, समजलों मी तुझ्या ह्मणण्याचा मतलब; पण आहेत कोण ह्या घरांत अशीं फाजील माणसें आपल्या एकांताचा भंग करणारीं ? छे तें कांहीं नाहीं. तुला करमत नसल्यास, एखादं मजेदार गोष्टीच पुस्तक आणून देतों हवंतर, प्रीतिविषयक कादंबरी ह्मणजे करमणुकीचें उत्कृष्ट साधन आहे.

कुसुम—मला कांहीं एक नको. ह्मणें समजलों तुझ्या ह्मणण्याचा मतलब. इतका निर्लज्जपणा स्वीकारणं हें शहा-

ण्या ह्मणविणाऱ्या माणसाचं काम नव्हे. माझा एकटीचाच • मला एकांत पाहिजे. तूं चालता हो इथून.•

गुलाब—ह्मणजे तुझ्याविषयीं मला कांहींच कां काळजी नाहीं असं तूं समजतेस ! वः तुझ्या जिवाला जर कांहीं झालं तर त्याची काळजी मी नाहीं करणार तर दुसरा कोण करील ?

कुसुम—माझ्याबद्दल कुणीही काळजी करायला नको. तुला तुझ्या स्वतःची काळजी असली ह्मणजे पुरे आहे.

गुलाब—अग, पण ती अशानें राहणार कशी ? तूं अंमळ अस्वस्थ असलीस ह्मणजे इकडे माझ्या जिवाला मुळींच चैन पडत नाहीं; तेव्हां माझीच जरी मी काळजी करीन ह्मटलें, तरी तुझ्याबद्दल काळजी करावीच लागते. कुसुम हें असं काय बरं आज करत्येस ? माझ्याशींच तुला बोलण्याचा इतका कंटाळा !

कुसुम—( त्रासून जाऊन रागानें ) तुला इथून जा ह्मणून सांगितलं ना ? जास्त एक अक्षर सुद्धां उच्चारूं नकोस. किती रे तुझा लोंचटपणा !

गुलाब—( स्वगत ) कांहींच डाळ शिजूं देत नाहीं. असो, प्रारंभ तर करून पहावा. अहाहा ? मुलगी पण काय मुलगी आहे, ( डोळे मिचकावीत ) मोहकपणा तरी किती ! नुसतं तोंडाकडेसच पहात रहावंस वाटतं. ( उघड ) हें बघ, मी आलों तो जाण्याकरतांच आलों आहे; पण तुझ्याशीं मला थोडं बोलावंसं वाटतं. एक फारच महत्वाची—फायदेशीर अशी गोष्ट तुला सांगायची आहे.

कुसुम—तुझ्यापासून आणि फायदेशीर ! ही भाषा स्वप्नांत सुद्धां नको, तुला बोलावंसं वाटत असेल तर घरांत

आत्याबाई स्वस्थ बसल्या असतील, त्यांच्याजवळ जाऊन बोलत बैस. मला नको त्रास देऊं. .

गुलाब—अं: त्या खप्पड थेरडी बरोबर गोष्टी करण्याची इथे कुणाला हौस आहे! कुसुम, माझें फक्त तुझ्याशींच काम आहे. नको असा माझा धिक्कार करूं.

कुसुम—( एकदम ) काय काम! कांहीं कर्जाबद्दलचे पैसे, बेशरमपणानें पुन्हः मागायला आला असशील.

गुलाब—( अंमळ रागानें ) ह्मणजे मला तूं आपला नेहमीचाच कर्जबाजारी समजत्येस अं?

कुसुम—समजायला कशाला पाहिजे. तू आहेसच तसा अगदीं निकडीच्या पेंचांत सांपडून तोंडाला काळीमा लागण्याचा प्रसंग आला असतां दीन वदनानें भीक मागायला इकडे येत असस, कांहीं आठवतं का तुला. अशा कित्येक वेळेस मदन आणि मी मिळून द्रव्यद्वारां तुझ्यावर केलेल्या उपकारांची आठवण तुझ्या हृदयांतून अजून खात्रीनें नाहींशी झाली नाहीं.

गुलाब—मला तर कांहीं आठवत नाहीं; आणि कदाचित असेलच, तर कुसुम, त्या सर्व मागच्या गोष्टी. आतां त्या उकरून काढण्यांत काय अर्थ आहे. आतांची माझी स्थिती तशी नाहीं. मदनानें आपल्या मूर्खपणाचा कळस केल्यामुळें, ती जागा, तो अधिकार मला मिळाला आहे. बाबांच्या मनांतून आपल्या सर्व संपत्तीचा वारस एकटया मलाच करण्याचा आहे.

कुसुम—वः फार चांगलं. मग तुझं सप्तजन्मींचें दारिद्र्यच फिटलं ह्मणायचं, जा तर त्या द्रव्याकडे पहात बसून

आपल्याला धन्य मान.

गुलाब—तें असो. माझ्या मनांतून तुला दुसऱ्याच एका गोष्टीविषयीं ह्मणायचं आहे. कुसुम, माझ्यावर थोडी तूं दया करशील ही मला फार आशा आहे. मी त्याचकरतां जीवीत धारण करून आहें.

कुसुम—( चकीत होऊन ) काय ! दया करायची !

गुलाब—होय, दयाकरायची. माझ्यावर उपकार करायचे. हें बघ, तुझ्या प्रीतीनें मी अगदीं वेडा होऊन गेलों आहे. तुझा हा रमणीय, मोहक अहाहा-सुकुमार चेहरा क्षणोक्षणीं माझे मनोविकार उच्छृंखल करून माझें देहभान नाहींसें करतो. तुझें मधुर स्मित पाहून माझ्या हृदयाला तीव्र डागण्या बसतात. मला अन्नपाणी, ऐषराम, कांहींएक गोड लागत नाहीं. कुसुम, माझी अर्धांगी होण्याचं तूं मला-

कुसुम—( दचकून रागानें ) काय ! खबरदार असले शब्द फिरून उच्चारलेस तर.

गुलाब—माझी अर्धांगी होण्याचं मला वचन देऊन माझा जन्म धन्य कर. कुसुम, त्यांत तुला एवढं विपरीत काय वाटलं ? गुलाब आणि कुसुम, यांचा सारखेपणा, यांचें एकजातियत्व आहे, त्यांत भेद मुळींच नाहीं. मग तूं आणि मी एक झालों तर त्यांत काय वाईट झालं ? मदनवर तूं प्रीति करीत होतीस, मग त्यापेक्षां हजारपटीनें योग्य अशा मला वरण्यास कोणती तुला हरकत आहे ?

कुसुम—कुसुम आणखी गुलाब एक जातीचे आहेत, त्यांच्यांत भिन्नभाव नाहीं, पण त्यामुळें एकमेकांची एकमेकांना मुळींच किंमत नाहीं. एका पुष्पाच्या सुवासापासून दुसऱ्या पुष्पाला कधीं तरी आनंद, किंवा तरी सौख्य झालं

आहे कां ? त्याचा उपयोग जाणणारा- त्याचा खरा उपभोक्ता निराळाच असतो; आणि तो कुसुम चापधारी- मदन नाहीं, तर दुसरा कोण असणार ? त्याच्या एका केंसाची सुद्धां तुला बरोबरी नाहीं. चल, चालता हो इथून.

गुलाब— पण तो तर आतां अगदीं भिकारी, स्वतःचच कसं होईल याची अहोरात्र काळजी वाहणारा झाला, त्याची आठवण काढण्यात काय अर्थ. तूं माझी हो, कीं जन्मभर ऐषआरामांत लोळशील. दुःख तुला स्वप्नांत सुद्धां शिवणार नाहीं; याचा विचार कर. बाबांना सुद्धां ही गोष्ट घडून येणं फार इष्ट आहे.

कुसुम—अस्सं आणि ह्मणूनच वाटतं हा लोचटपण करण्याला आपलं एवढं धाडस झालं आहे ? मला बाबाची नाहीं, कुणाचीच पर्वा नाहीं. साफ सांगतें, मी तुझ्याशीं लग्न कधींही करणार नाहीं.

गुलाब— ( त्रासून रोषानें ) पण ध्यानांत ठेव. तूं माझ्याशींच लग्न केलं पाहिजेस अशी बाबांची दृढ प्रतिज्ञा आहे आणि त्यांचा निश्चय ह्मणजे कालालाही न फिरणारा याचा तुला अनुभव आहेच.

कुसुम—( राग अनावर होऊन ) आणि माझीही हीच प्रतिज्ञा आहे. माझे पंचप्राण कुणी हरण केले तरी बेहत्तर पण तुझाशीं—ह्या पाषाणहृदयी मागाशीं लग्न—ही गोष्ट माझ्या हांतून काळात्रयींही होणार नाहीं. चांडाला, असले शद्ब उच्चारून माझ्या आधींच दुःखानें होरपळलेल्या काळजावर फिरून चटके देण्याला तुला लाज नाहीं वाटत. तूं इथून निघून गेलास तर ठीक आहे, नाहींतर आतांच्या आतां मी

आपल्या हातानीं आपला खून करून घेण्याला कधींही मागें पुढें पाहणार नाहीं. तुझं दर्शन मला असंह्य झालं आहे.

( तोंड फिरवून कुसुम बेशुद्ध पडते. )

गुलाब—ठीक आहे. याचा चांगला विचार कर. मी जातों. ( स्वगत ) जाते कुठें असलीं सोंगं करून. ही जेमतेम पहिली वेळ आहे. एकदां नाहीं दुसऱ्यांदा, दुसऱ्यांदा नाहीं तिसऱ्यांदा; केव्हां तरी येईलच ताळ्यावर. प्रयत्नांतीं परमेश्वर असतोच. कुसुम केव्हांना केव्हां तरी माझी झाल्याशिवाय रहाणार नाहीं. ( पडद्यांत–गुलाब, अरे गुलाब, कांहीं जरुरीच्या कामाकरतां जाधवराव बाहेर जायला निघाले आहेत. 'तुला येऊन भेटून जा' ह्मणून त्यांनीं मला निरोप सांगितला. सांगितल न ते अगदीं तुझी वाट पहात आहेत— ) हा आत्याबाईचा शब्द. हो, आलों हो आलों—

( गुलाब निघून जातो. पडदा पडतो. )

—प्रवेश १ ला समाप्त—

---

# प्रवेश २ रा.



स्थळ—हनुमानरस्त्यावरील शिरक्यांचें घर.

( यशवंतराव शिरक्यांची पत्नी मनोरमाबाई, मालती, वसंत आणि मदन बसले आहेत. )

मनोरमा—वसंत, कसलं रे तें पत्र ? वांच पाहूं. बहुधा त्या दिवशीं नानासाहेबांनीं पाठविलेल्या पत्राचंच उत्तर असेल. बरंच लवकर आलं ह्मणा.

वसंत—मला असंच वाटतं. बहुतेक तेंच असावं.

(वाचतो) "आपण लिहिल्याप्रमाणें गोष्ट घडून आलेली वांचून मला फारच वाईट व चमत्कारीक वाटलं. अमकीलाच तूं वर आणि तमकीला वरलंस तर तुला मी माझा मुलगा असें न समजतां तुझ्या जन्माचं मातेर करीन, अशी इच्छा करणारा बाप काळजाचा पितृजातीला अपवाद तर खराच; पण अलीकडच्या तरुण पोरांच्या वृत्तीही कांहींशा चमत्कारिक होऊं लागल्या आहेत. त्यांना सर्व कांहीं नवीन तऱ्हा, नवीन विचार, नवीन आचार, नवीन माणसांचा सहवास, सर्वच कांहीं नवीन हवं, असं वाटूं लागलं आहे. जुन्या माणसांचीं मतं ह्मणजे निव्वळ फाजील गोष्टी, त्यांत कांहींच अर्थ नाहीं, असा त्यांचा समज झाला आहे; करितां आपल्या बापाच्या सांगण्याकडे दुर्लक्ष करून आपलाच हेका चालवून मदनानें जो आपल्या मूर्खपणानें आपल्याच पायावर धोंडा पाडून घेतला आहे, ही गोष्ट ह्मणजे अलीकडे नेहमीं घडणाऱ्या गोष्टीपैकींच एक झाली ह्मणायची. असो, त्याबद्दल आतां विचार करण्यांत अर्थ नाहीं. आपण पत्रांत, मदन हल्लीं ज्या स्थितींत आहे तिचं वर्णन केलं तें वाचून त्याबरोबरच मला दुसऱ्याही एका गोष्टीची आठवण झाली. ज्या जाधवरात्र शिंद्यानें एवढ्याशा क्षुल्लक कारणांवरून पोटच्या पोराला घराबाहेर घालवून दिलं, त्याच्या सहवासांत माझी प्रत्यक्ष बहीण शांता इनें आपला सारा जन्म कशा रीतीनें काढला असेल, हे विचार एकाकीं माझ्या मनांत येऊन चित्तवृत्ति अंमळ क्षुब्ध झाली. असो, तिचाच हा मुलगा—माझा सख्खा नातलग आहे. त्याच्या विषयीं होईल तितका प्रयत्न मला केलाच पाहिजे. त्याच्या करतां इथल्या जहागीरदारांच्या इथें दरमहा शंमर रुपयांची नोकरी मी

पाहून ठेवली आहे. मदन हल्लीं ज्या स्थितींत आहे, त्या मानानें पाहतां दरमहा शंभर रुपये ह्मणजे कांहींच नव्हे; पण दैव अनुकूल असल्यास जहागीरदारांच्या वशील्यानें त्याचा चांगलाच उत्कर्ष होण्याचा संभव आहे. मदन हुशार आहे. तो आपल्या आंगच्या गुणांनीं त्यांना संतोषित केल्या वांचून रहायचा नाहीं. वरकड मजकूर ठीक आहे. आह्मी सर्वजण खुशाल आहोंत, काळजी नसावी. शिरक्यांच्या इकडील खुशाली उलट पत्रीं जरूर लिहावी, त्यांत मनोरमाबाईच्या प्रकृतीची हाल कळविल्यावांचन राहूं नये. वसंत आपल्या वैद्यपणाच्या कामांत निष्णात असून कांचनपुरांत त्याची चांगलीच प्रसिद्धी झाली ह्मणून ऐकतों "–हें आपलं उगीच कांहींतरी लिहिलंय झाल–" हें पत्र मदनाला दाखवून तो ह्या गोष्टीला कबूल असल्यास, ताबडतोब त्याची इकडे रवानगी करून द्यावी. मी इथें त्याची उतरण्याची वगैरे सर्व व्यवस्था पाहून घेईन. कळावें— "

मदन— व: कबूल ह्मणून काय विचारायचं ? कधींही न फिटतील असे हे माझ्यावर उपकार करीत असतां त्या गोष्टीला मी कबूल होणार नाहीं !

मनोरमा—नानासाहेबांच्या पत्राचं बरंच वजन पडलं ह्मणायचं !

वसंत—ह्मणून तर त्यांनीं लागलींच खटपट करून तिथें चांगलीशी जागा पाहून, ताबडतोब अशा अर्थाचं उत्तर पाठवीलं !

मदन—हे नानासाहेब कोण ?

वसंत—हे आपले नानासाहेब मोहिते. हमामचौकांत सुंदर नारायणाच्या देवळाजवळच्या मोठ्या वाड्यांत राहतात ते !

**मदन**—अहाहा! कितीतरी त्यांनीं हा माझ्याकरितां त्रास घेतला! मनोरमाबाई, माझ्यासंबंधानें नानासाहेबांनीं पाठविलेल्या पत्रांत काय लिहिलं तें मला ऐकण्याची फार इच्छा आहे.

**मनोरमा**—तें पत्र आतां कुठं आहे काय जाणें. वसंत?

**वसंत**— त्याची एक नक्कल मी आपणांजवळ करून घेतली आहे, ही हवीतर देतों. मदन स्वतःच वाचूं दे. ( पत्र देतो. )

**मदन**— अं: नक्कलच कां होईना. बघूं कुठं आहे ती. ( पत्र घेऊन वाचतो )—' पत्र लिहिण्याचा मुख्य उद्देश हें पत्र वाचून आपणाला कळेलच, आशा धरून लिहित आहें, तिकडे लक्ष्य असावं. आपण मागें इथें असतांना ज्याच्या गुणांची तारीफ करीत होता, तो जाधवराव शिंद्यांचा मदन आपल्या ध्यानांत असेलच. तो आतां चांगला तरुण झाला आहे; तेव्हां लहानपणचे त्याचे विचार बदलून तरुणपणच्या विचारांना त्यानें वश होणें हें अगदीं साहजीक आहे. त्याचें मन शिरक्यांच्या मालती—' वः ह्मणजे अगदीं इत्थंभूत हकीकत लिहिली आहे ह्मणायची, कांहींच बाकी ठेविली नाहीं—' शिरक्यांच्या मालतीवर बसून दोघेंही परस्परांच्या प्रेमपाशानें अगदीं बद्ध झालीं आहेत, तीं इतकीं कीं, दोघांचाही विवाह होणं, याशिवाय त्यांना सुखकर, त्यांना हितावह दुसरी गोष्ट कोणचीच वाटत नाहीं. पण नाइलाज आहे. ही गोष्ट जाधवरावांना मुळींच पसंत नसून त्यांचा निश्चय आपल्या मुलांचीं लग्नें चांगल्या रुपवान, गुणवान, कुळवान, अशा मुलींशीं करायचीं नसून केवळ संपत्तीबरोबरच तीं लावावींत, असा झाला आहे. शिरके

थोरघराण्यांतले पण दरिद्री हें आपल्याला माहित आहेच. तेव्हां मालती बरोबर मदनचा विवाह या गोष्टीला जाधवरावांचा रुकार प्राणांतींही मिळायचा नाहीं. त्यांनीं ह्या बाबतींत मदनाला पुष्कळ सांगून पाहिलें, पण मदनाचा जेव्हां निश्चय ढळत नाहीं, असं त्यांना वाटलं, तेव्हां त्याला घरांतून त्यांनीं घालवून देऊन आपल्या संपत्तीचा वारस एकट्या गुलाबला केला. मदनानें तर हा मूर्खपणा केलाच, पण मला यांत जाधवरावाचाही हा हट्ट विनाकारण आहे असं वाटतं. अशा स्थितींत इथें क्षणभरही न राहतां उदरनिर्वाहाकरतां मिळविण्याच्या उद्देशानें कुठेंतरी परस्थळीं जाण्याच्या विचारांत मदन आहे. ही गोष्ट मला समजली तेव्हां इकडे तिकडे कुठेंतरी भटकत राहण्यापेक्षां तो आपल्याजवळच असावा असं वाटून ही आपणाला तसदी देत आहे, याची क्षमा असावी. सारांश थोडक्यांत सांगायचें ह्मणजे एवढेंच कीं, आपल्याजवळ त्याला ठेवून मालतीवरील प्रेमाचा जेणेंकडून त्याला विसर पडेल '—ही गोष्ट मात्र कधींही होणें शक्य नाहीं. " अशी तजवीज करावी, कारण शिंद्यांची संपत्ती एकट्या गुलाबच्या हातांत जाणं ही गोष्ट कोणत्याही तऱ्हेनं श्रेयस्कर होणार नाहीं; तरी याचा विचार करून पत्राचें उत्तर लवकर काय तें यावें. वाट पहात आहे. कळावें— " नानासाहेब मोहिते.

( पत्राची घडी करून ) इतकी काळजी नानासाहेब करीत असल्यावर मला काय कमी पडणार आहे ! पण मनोरमाबाई, नानासाहेबांना माझ्याविषयीं हा शब्द आपणच टाकलांत, यांत शंका नाहीं. आपण सांगितल्याशिवाय एवढी कळकळ नानासाहेबांनीं पत्रांत कधींच दर्शविली नसती !

यावरून माझें अक्षय कल्याण व्हावं याविषयीं आपली इच्छा पूर्णपणें दिसून येते.

मनोरमा— नुसतें माझ्या सांगण्यानेंच काय होणार ! मदन, तुझा सरळ व प्रेमळ स्वभाव, तुझ्या आंगचे गूण, तुझी हुशारीच जन्मभर तुझें कल्याण करणार आहे.

मदन—एकूण माझें हें कृत्य आपल्याला पसंत आहे ह्मणाचं तर. मालती व मी लहानपणापासून एकमेकांवर प्रेम करीत आलों, व जसजसे दिवस जाऊं लागले, तसतशीं आमच्यातलीं प्रेमबंधनेंही दृढतर होत चाललीं. होतां होतां तीं अभेद्य होऊन इतर कोणत्याही उपायांनीं वेगळीं होणारीं नाहींत ही गोष्ट बाबांच्या लक्षांत येतांच, त्यांच्या मर्जी-विरुद्ध जाऊन मीं आपल्या हातांनीं आपला नाश करून घेतला हा मोठाच मूर्खपणा केला, असं आपणाला नाहीं कां वाटत. अशा अविचारी माणसाची जन्माची सहचारिणी आपली मुलगी होऊं द्यावी कीं नाहीं, हा खरोखर मोठाच महत्वाचा प्रश्न ह्मणायचा !

मनोरमा— सकृतदर्शनीं पाहतां हा प्रश्न महत्वाचा दिसतो खराच, तुमच्या दोघांच्या एकमेकांवरील निःसीम प्रेमाचा परिणाम तुला कायमचें दुःख होत आहे. ही गोष्ट मला समजतांच प्रथम तू मालतीवर प्रीति केली नसतीस तर फार चागलं झालं असतं, असं मला वाटूं लागलं होतं. प्रेम हें केवळ लावून घेतल्यानेंच जास्त वाढतें, जगांत सुखी होण्याचा खरा मार्ग केवळ पैसा, पैसा असला ह्मणजे वाटेल तशा स्थितींत मनुष्य असला तरी त्याला मान मिळतो, चारचौघांत त्याचें नांव पुढें येतें, पैशानें नाहींनाहीं त्या गोष्टी घडवून आणतां येतात, हें सर्व साधारण तत्व माझ्या डोळ्यां-

समोर मला चक्क दिसूं लागून कुठून तुझी व मालतीची गांठ पडली, असं मला झालं होतं. फार काय पण, इतःपर तुझा तिचा मुळींच संबंध राहूं नयें, तुला आमच्या येथें येण्याची, मालतीची भेट घेण्याची सक्तमनाई करावी, असा क्षणिक विचार माझ्या मनांत पूर्वी आला होता. पण तो क्षणिकच विचार! लागलींच हे कुतर्क मनांत आणल्याबद्दल, जन्माला येऊन मनुष्याचें खरें सौख्य ह्मणजे पैसा, ह्या सर्वथैव खोटया समजूतीबद्दल माझा मलाच पश्चात्ताप झाला. माझा तर आतां निश्चय झाला आहे, निदान माझें तर असें मत आहे कीं, स्त्रीपुरुषांचें परस्परांवरील निःसीम प्रेम त्यांच्या अक्षयसुखाकरितांच जडत असतं, त्याच्या आड येऊन त्यांचा घात करण्याची इच्छा ह्मणजे केवळ अधम-पणाची कृती, दोघांचाही सर्वस्वीं नाश करून जन्मांतरीचा आपला सूड उगवून घेण्यासारिखें आहे. छे. छे. माझ्या हातून असली कृती कधींही होणार नाहीं. क्षणिक दिसणाऱ्या मनुष्याचे आचारविचार बदलविणाऱ्या त्याच्या मूळच्या स्वभावांत जमिनअस्मानचें अंतर पाडणाऱ्या अघोर घातकी पैशाकरितां आपल्या पोरीचा—आपल्या पोटच्या गोळ्याचा मी जन्माचा सत्यनाश कधींही होऊं देणार नाहीं!

मदन—अहाहा! हे तुमचे आणि माझे विचार कितीतरी तंतोतंत जुळतात ह्मणून सांगूं! मनोरमाबाई, मी लहान, जगाचा अजून मला फारसा अनुभव नाहीं, ह्मणून माझ्या ह्मणण्याचा कदाचित आपल्याला राग येईल, तसें नच झालें तरी त्याबद्दल आश्चर्य तरी खास वाटेल, पण खरोखर अगणित पैसा ह्मणजे मी सत्पुरुषाला कुमार्गाकडे वळवून नेऊन नरकाचें साधन करून देणारी

अशी भयंकर घातुक चीज आहे असें समजतों. पुष्कळ पैसा जवळ असला ह्मणजे कित्येक लोक आपणाला मोठे धन्य मानतात, मी ह्मणजे कुणी मोठा सत्वशीय, सन्माननीय, श्रेष्ठ, आणि शहाणपणाची केवळ मूर्ती आहें, याच घमेंडींत ते असतात. जन्माला आल्याचें खरें सार्थक ह्मणजे जवळ रगड पैसा बाळगून त्याकडे पहात बसणें. पैसा ह्मणजे केवळ मोक्षप्राप्ती आहे, असं त्यांना वाटूं लागतं.—

मनोरमा—पण, मदन, कुणाला उद्देशून तूं हें सांगत आहेस ? तुला प्राप्त होणारा पैसा तुझ्यापासून हिरावून घेतला, किंवा आह्मी अगदीं गरीब आहोंत, जवळ पैसा असल्या कारणानें वाटेल तशी चैन करीत हिंडतांना श्रीमंत लोकांना आपण पाहतों, तें सौख्य आमच्या नशीबीं नाहीं ह्मणन अशा रीतीनें तू आमच्या मनाचें समाधान तर करीत नाहींसना ?

मदन—छे. छे. तुमचें समाधान करण्याची कांहींच जरूर नाहीं. तुह्मी श्रीमंत नाहीं, ह्मणूनच तुह्मी सुखी अहांत. खरं समाधान तुह्मालाच आहे. मनोरमाबाई, द्राक्षं हातीं लागत नाहींत ह्मणून तीं आंबट आहेत, अशाप्रकारचं माझं वर्तन आहे, असं तुह्मी मुळींच समजूं नका. तुह्माला सांगतों, पुष्कळसा पैसा ह्मणजे नशीबाच्या जोरावर आयती संपत्ती अचानक हातांत आल्याशिवाय, किंवा पुढें वृद्धपणीं उपयोगीं पडेल ह्या आशेनें जन्मभर जिवापाड मेहनत करून पैसा मिळविणाऱ्या कित्येकांना अधमपणानें सफाई नागवून सोडून तें द्रव्य घशांत ओतल्याशिवाय, कधींही जमत नसतों हें ध्यानांत ठेवा. खरी मेहनत करून जर लोक असे एकदम श्रीमंत झाले असते, तर अंगार्पि-

डोनी सशक्त, निरोगी, इमानी अशा कित्येकांच्या ध्यानांत मूर्तिमंत वास्तव्य करीत असलेलं दारिद्र्य क्वचितच कुणाच्या नजरेस पडतं. नाहीं, नाहीं. तुह्मी कांहींही ह्मणा-या द्रव्याशेच्यापायीं, मागचा पुढचा कांहीं एक विचार न करतां वेळाशक अतीं निंद्य अशा कुमार्गाकडेस प्रवृत्त झालेले कित्येक माझ्या पहाण्यांत आले आहेत. ह्या पैशाच्यापायीं सर्वस्वी आपल्या विश्वासावर अवलंबून राहणाऱ्या, निरपराधी अशा कित्येक बिचाऱ्यांचे, आपल्या नातलगांचे, आपल्या सख्या भावांचे खून घडलेले हजारों माझ्या ऐकण्यांत आले आहेत. द्रव्य आणखी अधिकार याच्या मदानें धुंद होऊन नाना प्रकारचीं साहसें केल्यानंतर अखेरीस पश्चात्तापाग्नीचे चटके खातखात घोर यमयातना भोगीत राहिलेल्या कित्येकांचीं चरित्रें मीं वांचलेलीं माझ्या हृदयांतून अजून स्मृतिगत झालेलीं नाहींत. पैसा ह्मणजे दुर्बुद्धीचें माहेरघर आहे. दीन, अनाथ, पंगू, अशा गरीबांवर परोपकार करण्याचें द्रव्यवान मनुष्याच्या स्वप्नांत सुद्धां येत नाहीं. साधारण स्थितींत असणाऱ्या लोकांच्या हातून घडलेल्या पुण्यसंचयालाही तो कित्येकवेळां परांगमुख होतो; व शेवटीं स्वतःलाही नाहीं, व दुसऱ्यालाही नाहीं, अशा स्थितींत मृत्यूची गदा येईपर्यंत काळ कंठून त्याच द्रव्याला कायमचा अंतरून त्यास मुकाट्यानें परलोकचा मार्ग धरावा लागतो ! अरेरे कायही स्थिती ! !

मनोरमा—( सुस्कारा टाकून ) मदन, तुझं ह्मणणं कांहीं खोटं नाहीं. अशीं हजारों उदाहरणें घडलेलीं आपण ऐकतों व पाहतों. पण मी असं ह्मणते, ह्या जगांत राहून मुख्य उद्देश पैसा मिळवावयाचा, आहारी व्यवहारी प्रत्येक

गोष्टींत पैसा अत्यंत आवश्यक आहे, असं जे लोक ह्मण-
तात व आपणही त्यांचा अनुभव घेतों, तें उगीच कां ?
' द्रव्येण सर्वे वशः ' हें जर खरें आहे, तर निव्वळ पैशा-
लाच हा दोष कसा देतां येईल ?

मदन—व: पैशाची अवश्यकता नाहीं असं कोण ह्मणेल ?
त्यावर तर हें सर्व जग चाललें आहे, पण माझ्या ह्मणण्याचा
अर्थ हा नाहीं. माझा मळ उद्देश पैशाच्या विपुलतेचा
अनिष्ट परिणाम दर्शविण्याचा होता. व तसं नसतं तर, नाना-
साहेबांनीं दाखविलेल्या कळकळी बद्दल आपली सहानुभूती
दर्शवून इतक्या लांब जाण्याला मी कधींच तयार झालों
नसतों. अत्यंत अवश्यक अशा गोष्टी, पण जास्त झाल्या
ह्मणजे त्यापासून अनिष्ट परिणाम घडलेले, मनोरमाबाई,
आपण नाहीं का नेहमीं पहात. पाणी हे प्राणिमात्राचें केवळ
जीवित आहे, हें जरी निःसंशय खरें, तरी अथांगपाण्या-
चा संशय ह्मणजे हजारों मनुष्यांच्या, वस्तूंचा सत्यानाश
करण्याला नेहमीं कारणीभूत होतो. दररोजचें आपलें अन्न
पक्कदशेला आणण्याला अग्नी हें मुख्य साधन आहे, पण त्याचा
फैलाव शतशः घरादारांची, सामानसुमानांची राखरांगोळी
उडवितांना कुणाच्या नजरेस पडत नाहीं, तुह्मींच सांगा ?

मनोरमा—इतक्या सर्व गोष्टी खऱ्या असतांना सुद्धां
द्रव्याकरितां काय लोक चरफडतात ! कित्येकांना तर द्रव्य
संचय करणें ह्याशिवाय कांहींच ठाऊक नसतें. दुसऱ्या अनेक
निराश्रितांना संकटावस्थेंत सांपडलेले प्रत्यक्ष पाहूनसुद्धां
शक्य असतां त्याला त्यांतून सोडविण्याइतका परमार्थ
त्यांच्या हांतून घडत नाहीं, ही मोठी शोचनीय गोष्ट
ह्मणायची !

मदन—आणि अशा उपटसुळांच्या थोरल्या वाड्यांत लक्ष्मीचा सतत निवास, ह्मणजे ईश्वरानें तिची योजना अपात्रीं केल्याप्रमाणेच होय !

मनोरमा—खरं आहे. मदन, अखेरीस संपूर्ण विचारांतीं मालतीकरतां तूं हें वैराग्य धारण करण्याला तयार आहेस, हें अगदीं ठरलं ह्मणायचं ?

मदन—यांत आणखीं संशय कसला उरला आहे ! आपली ह्या गोष्टीला संमती असली ह्मणजे झालें. मुद्दाम आपली भेट घेऊन आपलें अनुमोदन घेण्याकरितांच हा मी आज आलों आहें.

मनोरमा— तें वचन मीं तुला पूर्वीच दिलं आहे. ह्याशिवाय दुसरी कोणतीच गोष्ट मला इष्ट नाहीं.

मदन— ( आनंदानें ) मग, मालती सर्वस्वी माझी झाली ! पण मनोरमाबाई, पुन्हा इथें येऊन प्रिय मालती बरोबर सुखानें राहूं लागण्यापूर्वी कांहीं दिवस मला तुम्हां सर्वांना सोडून बरेंच लांब जावें लागेल, पण मी अहोरात्र मेहनत करून होईल तितकें लवकर इकडे परत येण्याची खटपट करीन, त्याविषयीं तुह्मी काळजी करूं नका, मला आज गेलेंच पाहिजे.

मनोरमा— यांत काळजी करण्याचें काय कारण ? खरोखर याच आशेनें मालतीचे दिवस मोठ्या आनंदांत जातील ! होयनग ?

( मालती कांहीं न बोलतां खालीं मान घालून हंसते )

मदन— ठीक आहे तर मी आतां येतों. आपणां दोघांकडली खुशाली नेहमीं एकमेकांना कळेलच !

मनोरमा— पण कुसुमची काय वाट ? बिचारी गरीब

पोर अशाच तऱ्हेनें जाधवरावच्या अविचाराला बळी न पडो म्हणजे झालें !

**मदन**— त्याविषयीं काळजी नको. तिच्या नशिबानें तिला चांगलाच नवरा मिळेल यांत शंका नाहीं. ( मालती आपल्या आईला खुणावते. )

**मनोरमा**— मदन, मालतीनें तुझ्याकरतां मुद्दाम मोठ्या हौसेनें सर्व तयारी करून ठेवली आहे, तेव्हां इथेंच फराळाला येण्याचा मी तुला आग्रह करतें.

**मदन**— या कामांत मला आग्रहाची मुळींच जरूर नाहीं. हा मी लागलींच परत येतों.

( सर्व जातात. पडदा पडतो. वसंत एकटाच बाहेर येतो. )

**वसंत**— ( स्वतःशीं ) यांचं तर सर्व जुळलं. पण आतां आमची काय वाट ? मालतीवर मदन प्रीती करी, तिची प्राप्ती त्याला नुसत्या पैशालाच आंचवून झाली. पण माझी मनोहारिणी कुसुम मला कशी मिळणार ? प्रथम भेट झाली तेव्हांच तिच्या त्या गोड चेहऱ्यानें माझ्या मनाला पक्का मोह पाडला आहे. तिच्या त्या मऊ लुसलुशीत गालांचें मी चुंबन घेऊं लागलों, तेव्हांच मला प्रथम खऱ्या सौख्याची कल्पना झाली ! पण ती आतां त्या दगडाच्या-त्या जाधवरावच्या ताब्यांत आहे. तिची माझी भेट फिरून कशी होते काय जाणें ( समोरपाहून ) पण हा कोण ? हा तिथलाच गडी ! कायरे, काय खबर आहे ?

( एक गडी येऊन पत्र देतो. )

**गडी**—खबरबिबर कुणाला ठाऊक काय आहे, पण हें एक पत्र तुम्हाला द्यायला आमच्या कुसुमताई साहेबांनीं सांगितलें आहे.

वसंत— काय बरें यांत असावं ! ( वाचतो ) ' माझे प्रियकर वसंतराव, आपली माझी भेट झाली ही गोष्ट चांगली कीं वाईट झाली हें मी कांहींच जाणूं शकत नाहीं, पण आपली भेट व्हावी असं मात्र माझ्या मनाला नेहमीं वाटतं. आपला नेहमीं सहवास घडावा ही इच्छा मला उत्पन्न होते. तसं व्हावं म्हणून मी किती तरी प्रयत्न करतें, पण माझे कांहीं अनिष्ट ग्रह माझ्या इच्छेविरुद्ध येतात त्याला मी काय करूं ! बायकांचं लग्न झालं म्हणजे त्या परस्वाधीन झाल्या असं म्हणतात, पण माझी स्थिति अगदीं उलट आहे. ज्या वयांत मीं स्वतंत्रपणें हिंडावं, खेळावं त्या वयांत मी परतंत्र आहें. कालपासून माझ्या जिवाला मुळींच चैन पडत नाहीं. काय होईल कांहीं सांगतां येत नाहीं; पण एकवार त्वरित आपली भेट व्हावी असं मला वाटूं लागलं आहे. आपल्याला हें पत्र देणारा गडी माझ्या अगदीं विश्वासांतला आहे. तो कुणाला न कळत आपणाला मजकडे घेऊन येईल तरी पत्र पोंचतांच आपण त्याप्रमाणें करण्यास चुकूं नये. मी वाट पहात आहें— आपली कुसुम. ' मनांत आणलेल्या गोष्टीचा लागलाच प्रत्ययही आला. छेः अशा स्थितींत मला जरूर गेलंच पाहिजे.

( निघून जातो. )

**प्रवेश १ ला समाप्त.**



# प्रवेश ३ रा.

स्थळ—कुसुमचा दिवाणखाना.

( कुसुम आणि वसंत बसले आहेत असा प्रवेश होतो. )

वसंत—ह्या औषधानें तुला खात्रीनें बरं वाटायला लागेल, पण मी असं विचारतों, एकाएकीं असं व्हायला झालं तरी काय ! तुझ्या पत्रांतला तो मजकूर वाचून खरो-खर मी अगदीं घाबरून गेलों.

कुसुम—काय झालं आणि काय नाहीं. होऊं नये, पण दुर्दैवानें झालं आणि तें जर शेवटीं खरं झालं तर माझ्या दुर्दैवाचा कळस झाला ह्मणायचा !

वसंत—( आश्चर्यानें ) ह्मणजे ! जाधवरावाकडून कांहीं तुला पुन्हां त्रास झाला कीं काय ? कीं मदन परदेशीं गेला ह्मणून तुला वाईट वाटलं ?

कुसुम—छे मदन निघून गेला ह्मणून मला वाईट वाटत नाहीं; पण जो जायला पाहिजे होता तो गेला नाहीं ह्मणून वाईट वाटतं. गुलाब ह्मणजे कशा प्रकारचा मनुष्य आहे, हें आपल्याला माहीत आहेच.

वसंत—गुलाब ! त्याच्यासारखा दुष्ट, भयंकर घातकी मनुष्य साऱ्यादुनियेंत सुद्धां सांपडायचा नाहीं !

कुसुम—आणि त्याच्याशीं जबरीनें माझें लग्न लावण्याचा बाबांचा निश्चय झाला आहे. तें कानीं पडल्यापासून माझी चित्तवृत्ती मुळींच ठिकाणावर नाहीं माझ्याशीं लग्न केल्यानें सर्व संपत्ती परस्थळीं न जातां एकाच घरांत राहील, ही लालूच बाबांनीं त्याला दाखवून दिल्यापासून त्या चांडाळानें माझी सारखी पाठ पुरविली आहे. क्षणभरसुद्धां मला तो विसं-

बत नाहीं. तुम्हींच सांगा ज्या वस्तूचं आपल्याला दर्शन सुद्धां नको, तीच जर नेहमीं दिसूं लागली तर त्यापासून जिवाला कितीतरी त्रास होण्याचा संभव .आहे ! वसंतराव, माझ्या आजारीपणाचं कारण हेंच.

वसंत— ह्या घरांत सर्वच प्रकार कांहीं चमत्कारिक दृष्टीस पडतात. त्याला मनाई करणार कुणीच नाहीं काय ?

कुसुम—कोण मनाई करणार ! प्रत्यक्ष जाधवरावांनांच जर ती गोष्ट इष्ट आहे, तर दुसरें कोण मनाई करणार ? तें कांहीं नाहीं. मला आतां त्याचा कंटाळा आला आहे. मदन होता तोंपर्यंत प्रसंग आल्यास आपलं अंतःकरण मोकळं करण्याला जागा तरी होती, पण आतां काय ! वसंतराज, कसंही करा माझा भरंवसा सर्वस्वी तुमच्यावर आहे. ह्या हालांतून माझी सुटका करण्याचें नाहीं कां तुमच्या मनांत येत ?

वसंत—आतां, या क्षणाला ! पण त्याकरतां गुलाबबरोबर दोन हात करावे लागतील. त्याचा मला पक्का सूड घ्यावा लागेल, तुझी ह्या गोष्टीला संमती आहे ?

कुसुम— नको, नको, तसं केल्यानं एकदम सर्व गोष्ट बाहेर फुटून नुकसान होण्याचा संभव आहे. वसंतराज, मी तुम्हांला फार आवडते, तुम्ही माझ्यावर प्राणापलीकडे प्रीती करतां असं मी समजतें, पण माझ्याकरतां तुम्ही कांहींच काळजी घेत नाहीं, हें कसं ? तसं असतं तर मला ह्या हालांत कुजत टेवण्या इतकं धैर्य—इतकी निष्ठुरता आपल्याच्यानें कधींच झाली नसती. ( त्याच्या अंगावर मान टाकते. )

वसंत—कुसुम, हे चाफ्याची, तुझे हे विचार माझ्या मनाला

असह्य दुःख देतात. मी तुझ्या करतां काय करूं ? तुझ्या करतां हा मी आपला प्राण काढून ठेवूं, कीं तुला आड येणाऱ्या ह्या सर्वांची कत्तल उडवून तुला इथून माझ्यापाशीं घेऊन जाऊं ! कुसुम, तुझ्याविषयींची माझी प्रीति फक्त एक मृत्यूची गदाच नाहींशी करील ! इतर कशानेंही ती नष्ट होण्यासारखी नाहीं !

कुसुम—( अंमळ आनंदित होऊन ) वसंतराज, मग हा त्रास नाहींसा होणें कांहींच कठीण नाहीं. मी मग कशालाही जुमानणार नाहीं. तुमचें माझें प्रेम आहे, माझा व तुमचा-विवाह होणार हें जर निश्चीत आहे, तर कोणत्याही रीतीनें गुलाब माझ्याशीं लग्न करूं शकणार नाहीं, ही माझी खात्री आहे.

वसंत—वः तर मग माझ्याविषयींच का तुला शंका वाटत होती ! फार चांगलं. कुसुम ( तिचा हात धरून ) पण मी ह्मणजे एक क्षुल्लक मनुष्य, ह्या कांचनपुरांत साधारणपणें वैद्यकीचा धंदा चालवून त्यावर आपला उदर-निर्वाह करणारा, अशाची तूं सहचारिणी होणार, याचा कांहीं विचार केला आहेस का ? माझी ही दीन स्थिती तुझ्या एवढया श्रीमंतीच्या पासंगाला सुद्धां लागणार नाहीं !

कुसुम— ह्याच विचारानें माझ्या निश्चयाला ज्यास्त बळ-कटी आणिली. वसंतराज, श्रीमंती हें नांव सुद्धां मला ऐकायला नको ! तुमचा व श्रीमंतीचा संबंध नाहीं, ह्मणूनच तुमच्यावर माझी प्रीति आहे. ह्या धनमदानें धुंद झालेल्या माणसांचा जर मला सहवास नसता, तर माझें आयुष्य आजपर्यंत अशा दुःखांत कधींही गेलं नसतं !

वसंत— कुसुम तुझ्यावर माझी प्रीति आहे, पण तुझ्या करितां उघडपणें मागणी करणें ह्मणजे माझ्या शक्तीबाहेरच

मीं धाडस केल्यासारखें होणार ! लहान तोंडी मी हा मोठा घास घेतला असंच सर्वजण समजतील ! तुझ्या माझ्या स्थितींत जमीनअस्मानचें अंतर आहे. याकरतां आपल्या बरोबरीच्या अशा एखाद्या रूपगुणधनसंपन्न भाग्यवानासच तूं माळ घालावीस हें मला योग्य दिसतें.

कुसुम०— छे, छे, नका असले शब्द उच्चारूं ! हे विचार माझ्या मनाला दसपट जास्त दुःख देतील, त्याप्रमाणें कृती करणं ह्मणजे जन्माचें मातेरें करून घेतल्यासारखें होईल ! वसंतराज हा माझा जन्म फक्त तुमच्या करतांच आहे. इतर मला कशाचीही जरूर नाहीं. माझ्या ह्या कोमल प्राणाचें संगोपन चांगल्या रीतीनें करण्याचें काम फक्त तुमच्याकडेसच मीं दिलं. तुमच्यावांचून मीं व माझ्यावांचून तुह्मीं कधींही वेगळें राहूं नये. तुमच्या सहवासांत मी आपल्या आयुष्यांतील अत्यंत सुखद स्थितीचें रेखाटलेलें चित्र निव्वळ स्वप्नवत होऊन, तशा स्थितींतच माझा अंत न होवो, हेंच माझें परमेश्वराजवळ हात जोडून मागणें आहे.

वसंत— ( आनंदान तिला आलिंगन देऊन ) अहाहा ! कुसुम, माझे प्रियकर कुसुम ! तूं माझा प्राण आहेस. तुझ्या करतां निराळी काळजी मला कशाला करायला हवी ! तुझ्याहून श्रेष्ठ, तुझ्याहून प्रियकर, तुझ्याहून दर्शनीय अशी ह्या जगांत मला कोणचीच वस्तु दिसत नाहीं. तुझ्या मनोहर चेहऱ्यांत जी अद्भुत आकर्षणशक्ती ईश्वरानें निर्माण केली आहे, तिजवरून लोभनीय अशा दुसऱ्या अनेक वस्तु ओंवाळून टाकाव्या ! अहाहाहा ! कुसुम मी तुझ्याकरतां काय करणार नाहीं ?

कुसुम— मला इथून लवकर घेऊन जाण्याची तजवीज

करा ह्मणजे झालें. इथें राहाणं मला अमळीं प्रशस्त वाटत नाहीं. माझे बाबा, माझा प्रत्यक्ष भाऊ, पण त्यांचा सहवास माझ्या सुखवृद्धी करतां नसून माझ्या नाशाला मात्र कारण होतो.

वसंत— तुझ्या स्वतःपेक्षां सुद्धां कितीतरी पटीनें जास्त मला तुझ्याबद्दल काळजी वाटते. कुसुम तूं ज्या स्थितींत आतां आहेस, त्या स्थितींत जर मी असतों, तर आपणा-उभयतांचा विवाह केव्हांच झाला असता, पण तूं स्वतंत्र नाहींस, यामुळें नाइलाज आहे. गुलाबच्या नसलीस तरी जाधवरावांच्या तूं पूर्णपणें ताब्यांत आहेस, तेव्हां तुझें वाटेलं तें करण्याचा त्यांना अधिकार आहे, असें ते समजतात. ह्या दोन अनिष्टग्रहांचा त्रास नाहींसा करणें ह्मणजे केवढं कठीण काम !

कुसुम— ( अंमळ दचकून ) काय जाधवरावांचा नाश करावा लागेल ! पण हें कसें होणार ? किती अघोर कर्म हें!

वसंत— किंवा जिथें यांचा त्रास मुळींच पोंचणार नाहीं अशा दूर कोणच्या तरी स्थळीं तुला माझ्याबरोबर न कळत पळून जावें लागेल. यांत कोणची गोष्ट तुला जास्त श्रेयस्कर वाटते ?

कुसुम—दोन्हीही श्रेयस्कर नाहींत. पळून जाणं ही गोष्ट केवढी लज्जास्पद, आपल्या इभ्रतीला बट्टा लावणारी आहे. आंतला खरा प्रकार माहीत नसल्यामुळें सर्व लोक माझ्या पळून जाण्याला दूषण दिल्यावांचून कधींही रहायचे नाहींत; आणि पळून तरी जायचं कुठें ? आपलें घरदार, आपले आप्तजन सोडून देऊन दूरदेशीं भीतभीत अज्ञातवा-सांत दिवस घालवायचे ? वसंतराज, कधींही संवय नस-

लेल्या माझ्या अंगांत इतकं धैर्य कुठून येणार ! तुमच्या-बरोबर आल्यानें मी आपल्या चिजवस्तेला, आपल्या संपत्तीला मुकेन याची मला मुळींच काळजी वाटत नाहीं, पण हें आपलें कृत्य जनाला नाहीं पण मनाला तरी बरं वाटू लागेपर्यंत तें कसं माझ्या हातून घडणार ! याची मला काळजी पडली आहे.

बसंत—सर्वच गोष्टी अशक्य. पण जाऊं दे, नको असले विचार एव्हांच मनांत आणायला. प्राक्तनलिखित कधींही अन्यथा होत नाहीं. आपला दोघांचा विवाह व्हायचा असेल, तर तो झालाच पाहिजे. ती वेळ आली, ह्मणजे मार्गांतल्या वाटेल त्या अडचणी आपोआप दूर होतील, नाहीं नाहीं त्या घडून येतील. असे योग जुळून येतील कीं, ज्यांची कल्पना-सुद्धां होणार नाहीं. कुसुम तूं आतां स्वस्थ ऐस. तुझें मन माझ्याठायीं आहे तें तसेंच कायम राहूं दे. सर्व जग उलटल तरी चिंता नाहीं. आपल्या सहायार्थ तूं परमेश्वराचा धांवा कर. त्याच्यावरच पूर्ण भरंवसा ठेव. अहोरात्र दुष्कर्में, साहस, खून इत्यादि भयंकर कामांत ज्यांचा सर्व जन्म गेला आहे, गणतीसुद्धां करवणार नाहीं इतक्या ज्यांच्या पातकांच्या राशी पडल्या आहेत, अशावर सुद्धां दयाकरून त्यांना सन्मार्गा-कडे वळवून त्यांचा जन्म धन्य केला. अशांनासुद्धां त्याची कीर्ति अजरामर होऊन मोक्षप्राप्ती मिळाली. मग तुझ्यावरच तो दया करणार नाहीं असं कसं होईल ! संकटांत सांपड-लेल्याचा प्रतिपाळ करणं हें ज्याचें केवळ ब्रीद त्याला, कुसुम, तूं निराश्रित गाय कसायाच्या हातांत सांपडून प्राणरक्षणार्थ मोठ्यानें हंबरडा फोडतेस, हें कसं दिसणार नाहीं ! भक्तांच्या हांकेसरशीं डोळ्याचें पातें लवतें

न लवतें तों जो कोटयावधी योजनें धांवून आला त्याला तुझी हाक कशी नाहीं ऐकूं जाणार ! तुझ्या कोमल मनावर असह्य वज्रपात होत आहे हें पाहून त्याला द्रव आल्यावांचून कसा राहील ?

कुसुम—ईश्वराजवळ, असंच होवो ह्मणून मी पदर पसरून मागणं मागतें.

वसंत—आणि मीही आपल्या दोघांचें सख्य लवकर होवो हीच परमेश्वराजवळ रात्रंदिवस प्रार्थना करीन ! कुसुम, यानंतर आपल्या भेटीचा पुन्हां योगायोग आल्यास माझ्याविषयींचें आपलें प्रेम तूं मनांत ठेवून वरपंकी जाधव-रावची तुझ्यावरील कडी नजर कमी झाल्याचें, लहानपणा-पासून तारुण्यावस्था प्राप्त होईपर्यंत मोठया लडिवाळपणानें पाळून थोडक्याश्या क्षुल्लक कारणांकरितां तुजवर शस्त्र उपसणाऱ्या खाटकाच्या कृतीपासून त्यांचें मन परांगमुख झाल्याचं तुझ्या तोंडून मला ऐकू दे !

कुसुम—तें मात्र कितपत साध्य होईल याची मला शंकाच आहे, बाकी गुलाबचा तो हलकटपणा मात्र यापुढें मी अजिबात बंद करीन, यांत शंका नाहीं. मर्यादेबाहेर कोणतीही गोष्ट गेल्यावर त्याची मजा काय राहिली !

वसंत—हो, पण तुला मदनविषयीं कांहीं बातमी समजली का ? कुठें गेला, काय गेला, कांहीं तरी ?

कुसुम—छे. तें कसं कळणार ! नशीब जिकडे खेंचून नेईल तिकडे मुकाट्यानें जाण्याच्या उद्देशानें आजच सकाळीं त्यानें माझा निरोप घेतला !

वसंत— त्याच्या नशीबानें त्याला विलासनगरच्या प्रसिद्ध बाबासाहेब जहागिरदारांच्या इथें दरमहा शंभर रुप-

यांची सध्यां नोकरी मिळण्याची पक्की खात्री असल्यानें तेथील दादासाहेबांचें नानासाहेबांना नुकतेंच पत्र आलें, त्याप्रमाणें तूर्त मदन तिथें निघून गेला आहे. आपल्या इथल नानासाहेब मोहिते व दादासाहेब, यांचा चांगलाच घरोबा असल्यामुळें ही गोष्ट घडून आली यांत शंका नाहीं. मदन आपल्या हुशारीनें लवकरच चांगलें यश संपादन करून परत येईल.

कुसुम—( आनंदित होऊन ) दुःखांत सौख्य मानायला हें एक बरेंच कारण झालें ह्मणायचें. पण मदनाचा स्वभाव बाई भारीच भिडस्त आहे. स्वतः हवा तेवढा त्रास सहन करील, पण दुसऱ्याला बोलयचा ह्मणून नाहीं.

वसंत—अंः करायचं काय आहे वायफळ बडबड करून आपलें काम चोख केलें ह्मणजे झालें. बरं, अशा भाषणांतच जर गुंतून राहिलों, तर संबंध दिवस सुद्धां पुरायचा नाहीं. मलाही त्याचा कंटाळा नाहीं, व तुलाही नाहीं. मी आतां जातों. कुणाला न कळत आलों तों फार वेळ राहतां येत नाहीं. शिवाय आमच्या वैद्यगिरीच्या धंद्याला एकाच रोग्याकडे इतके तास घालवीत बसण्यांत अर्थ नाहीं; आणखींही कुणाची काळजी ठेवलीच पाहिजे.

कुसुम—( मुरकून ) पुरे, नेहमींचाच थट्टेखोर स्वभाव, हा वैद्यपणाचा धंदा बरा सांपडला आहे, त्यांत भर घालायला आपल्याला येऊन पुष्कळ का वेळ झाला ? आणि झालाही असला तरी रोग्याच्या प्रकृतीचें मान पाहून नको वाटतं तिथें कमीजास्त वेळ खर्च करायला ?

वसंत—हो तसं तर केलंच पाहीजे. शिवाय ( तिच्या हनुवटीला हात लावून ) असल्या रोग्याच्या प्रकृतीला

तर विशेष-प्रमापलीकडे जपलं पाहिजे.

कुसुम— ठीक आहे, पण फिरून कधीं भेट ? निदान वैद्य ह्या नात्यानं ?

वसंत—हो. वैद्य ह्या नात्यानें आह्मांला कुणाच्याही इथें केव्हांही जाण्याला मनाई नाहीं. मी येतों तर, पण एकवार प्रेमाचा एखादा गोडसा—

कुसुम—हें काय बाई नेहमीं नेहमीं ? ( गालांत हंसते )

वसंत—अग, नेहमीं नेहमीं कसलं ? येण्याजाणाच्या श्रमाबद्दल नको का कांहीं वैद्यराजांना बक्षिस !

( दोघेंही एकमेकांकडे पहात हंसत निघून जातात )

-प्रवेश ३ रा समाप्त-

---

## प्रवेश ४ था.

( जाधवरावशिंदे घराबाहेर पडण्याच्या बेतात आहेत, इक्यांत गुलाब येऊन त्यांना भेटतो. )

जाधवराव—हं, कसं काय गुलाब ! तुझ्या आशेची इमारत कुठपर्यंत उभारली गेली ?

गुलाब--कसली इमारत न कसलं काय ! अजून पायालाच ठिकाण नाहीं !

जाध०— तें कां ? तुझ्या खऱ्या संपन्न स्थितीचें, तुझ्या ऐषआरामी थाटाचें वर्णन ऐकून सुद्धां तिच्या तोंडाला पाणी सुटलें नाहीं ? इतका विवेक तिच्याच्यानें करविला ह्मणजे आश्चर्यच ह्मणावयाचें. मला वाटलं बहुतेक काम आटपलेंच असेल.

गुलाब— प्रथमतः तिनें माझें सर्व भाषण केवळ हंसण्-वारीच नेलें, पण तिच्याविषयींच्या माझ्या मनांतील निःसीम प्रेमाची साक्ष पटविण्याचा जों जों मी प्रयत्न करूं लागलों तों तों माझ्या दुर्दैवानें त्याचा कांहींच फायदा न होतां तिला तें निव्वळ खोटें आहे असं वाटून ती रागावली व त्या रागाच्या सपाट्यांत मला संपत्ती नको, सौख्य नको, ऐषआ-राम नको, कांहींएक नको असें ह्मणत ह्या संपत्तीबरोबरच माझाही तिनें बराच धिःकार केला. पण फिरून लहान आहे, खऱ्या सुखाची तिला कल्पना झाली नाहीं, कोणत्याही क्षुल्लक गोष्टीचा तिच्या कोमल अंतःकरणावर बराच परिणाम होतो ह्मणून मीं तो अपमान वगैरे सर्व बाजूला ठेवून तिची समजूत करूं लागलों. तों काय, माझ्या नशीबाचा फेरा विलक्षण—

जाध०— कां बरें ?

गुलाब—रागानें केवळ चवताळून जाऊन, ' मी तुझ्याशीं लग्न प्राण गेल्यास सुद्धां करायची नाहीं, साफ सांगते. ' असें चटकन् निष्ठुरतेचें उत्तर देऊन तिनें माझ्या सर्व आशेचा विध्वंस केला !

जाधव०— ठीक. ह्मणजे ही गोष्ट अगदीं निराशेच्याही बरीच पलीकडे गेली ह्मणायची ! तरी चिंता नाहीं. सतत उद्योग हा मनुष्याच्या आंगचा मोठ्यांतला मोठा सद्गुण आहे. त्याचें अवलंबन ह्मणजे यशाची केवळ ध्वजा आहे.

गुलाब—तें आलं माझ्या मागाहून ध्यानांत. ही आहे अगदीं पहिलीच वेळ, शिवाय नुकतांच घरांत एक प्रसंग घडून आला, त्याचा परिणाम तिच्या मनावर बऱ्याच अंशीं होण्याचा संभव आहे. मदनानें आपली आज्ञा अवमानून बेपर्वा-

ईनें कांहीं एक विचार न करतां घरांतून एकदम निघून जाणें ही गोष्ट जरी आम्हाला पसंत वाटली नाहीं, तरी तो–किती झालं तरी सख्खा वडील भाऊ, प्रत्येक गोष्टींत आमच्या सारख्या लहान अज्ञानी पोरांना शिक्षण देण्याचा ज्याचा अधिकार, तो आज अशा तऱ्हेनें निघून गेला तें पाहून एवढा मनुष्यासारखा मनुष्य मी–पण माझ्याही अंतःकरणांत गहींवर दाटून आला, माझ्याही मनाला अतोनात वाईट वाटलें, तो प्रसंग माझ्यानें पाहवला नाहीं, मग कुसुमच्या कोमल मनावर त्याचा जबरदस्त चटका बसला ही गोष्ट तिच्या हृदयांतून बरेंच दिवसपर्यंत नाहींशीं झाली नाहीं, तर त्यांत काय नवल ! किती झालं तरी एकाच रक्ताचं नात आहे, मन कळवळल्यावांचून कसं राहील !

जाधव०—तो पोरच विलक्षण माथेफिरू ! पण जाऊं दे. काळाचा महिमा कांहीं विलक्षण आहे. ह्या गोष्टीला थोडे दिवस लोटून गेले म्हणजे त्याचा हळूं हळूं विसर पडून नेहमींच्या विचारांचा पगडा तिच्या मनावर बसलाच पाहिजे.

गुलाब— क्षणिक वैराग्य तें, असं किती दिवस टिकणार !

जाधव०— गुलाब, मी आपल्या मृत्युपत्रांत माझ्या सर्व संपत्तीचा तुला एकट्यालाच वारस केला आहे.

गुलाब — पण, इतकी घाई करण्याचें काय कारण होतें ! मदनचा विचार अजून सुद्धां बदलेल.

जाधव०— छे, त्याचा विचार बदलून न बदलून काय कामाचा ! ज्याला पैशाची मुळीच कदर नाहीं त्याच्या ताब्यांत मीं आपली संपत्ती केल्यास तिची काय विल्हे-वाट लागेल, आणि काय नाहीं, याचा कांहींच नियम नाहीं,

तें कांहीं नाहीं. मदनाची जागा, त्याचा मान, त्याचा अधि-कार आतां सर्व तुझा आहे, आणि माझ्या मनाप्रमाणें तूं त्याचा उपयोग चांगल्या रीतीनें करशीलच.

गुलाब—मदन- माझा सख्खा भाऊ अगदीं द्रव्यहीन आणि मी अपार संपत्तीचा मालक, ही कल्पना खरोखर असह्य आहे, पण आपला शब्द माझ्याच्यानें मोडवत नाहीं. आपण एवढी संपत्ती मिळविली, पण त्याच्याबरोबरच तिची राखण मी कशा रीतीनें करतों हें सर्वांना दिसेलच.

जाधव०—तसच, कुसुमला तूं आपली करून घे, ह्मणजे थोडक्याच काळांत तुझ्या सौख्याला पारावार नाहींसा होईल. जा प्रयत्न कर, प्रयत्नांतीं यश आलंच पाहिजे. मला थोडं काम असल्यामुळें मी अंमळ बाहेरून जाऊन येतों.

( जाधवराव निघून जातो. )

गुलाब—( स्वगत ) दैव अनुकूळ असलें, ह्मणजे सर्व गोष्टी कशा आपोआप जुळून येतात. सर्वांत मला जास्त फायदेशीर गोष्ट ह्मणजे जाधवरावचा माझ्यावर पूर्ण विश्वास आहे, ही होय; आणि वरपंकी तरी तो तसाच शेवटपर्यंत राहील असंच मला वागलं पाहिजे, मग माझें अंतःकरण अगदीं विरुद्ध कां असेना ! ह्या साऱ्या दुनियेंत जर मला अत्यंत प्रिय ह्मणून कांहीं असेल तर तें माझें स्वतःच्या सौख्याकडे लक्ष हें होय. स्वतःच्या चैनीपुढें मला दुसऱ्या कशाचीही गरज नाहीं. अहाहा ! या वेळेस सूर्यनारायण क्षितिजावर बराच खालीं उतरल्यामुळ हा हनुमान रस्ता किंवा विलासबागेसारखीं थंडगार, आनंद देणारीं स्थळें किती तरी मनोहर वाटतात ! खरो-खर अशा वेळेला फिरायला जाण्याची फार मजा ! ( चालूं

लागतो ) आज घरून मी कुठें बरं जाण्याच्या उद्देशानें निघालों ? हो, त्या हमामचौकांत राहणाऱ्या आनंदराव पवाराच्या माधवाला भेटायला मला जायचं आहे. बरेंच दिवसाची भेट आहे, अंमळ उशीर लागेल, याकरितां तिकडला रस्ता लवकर गांठला पाहिजे. ( कांहीं पावलें चालून) माझ्या मनांत असलेल्या दोन गोष्टी पैकीं एक ह्मणजे मदनाचा हक्क अजिबात नाहींसा होऊन ह्या सर्व संपत्तीचा मालक मी झालों ही गोष्ट तर आपोआप घडून येऊन एका काळजींतून मी मुक्त झालों, पण दुसरी गोष्ट ह्मणजे कुसुमबरोबर विवाह. तेवढी पार पडली कीं माझ्यासारखा सुखी—माझ्यासारखा भाग्यवान एकटा मीच. हरतऱ्हेनें, सामोपचारानें नाहीं तर बळजबरीनें कुसुमला आपलीशी करून घेतल्याशिवाय सोडायची नाहीं. ( समोर पाहून) ओ, हो, बोलतां बोलतां मी बराच लांब निघून आलों आणि वेळ तरी किती झपाट्यानें निघून गेला. सूर्य प्रकाश कमी कमी होत जाऊन निशादेवीचा अंमल सुरू झाल्यानें काळोखसुद्धां हळूं हळूं पडायला लागला. ( आणखीं कांहीं पावलें पुढें जातो, तोंच एका ल्हानशा झोंपडींतून एक स्त्री ल्हान मुलाला हातांत घेऊन समोर येत असलेली गुलाबच्या नजरेस पडते. तिला पाहतांच एकदम दचकून गुलाबचा चेहरा काळा ठिक्कर पडतो. ) ( ती अगदीं जवळ आली असें पाहून त्रासानें ) कायग ? काय पाहिजे तुला, कोण तूं ?

नलिनी —( आश्चर्यानें ) ह्मणजे ! गुलाब अगदीं ओळखसुद्धां विसरलास वाटतं. माझ्यावरील प्रेमाकरितां सदोदित इकडे धांवत येणारा, आणि तोच तूं आज असं काय मुद्दाम वेड पांघरतोस ? बरेच दिवसांनीं ही भेट झाली ह्मणायची.

गुलाब— ( स्वगत ) जिला मी टाळण्याचा मुद्दाम इतके दिवस प्रयत्न करीत होतों तीच अचानक समोर येऊन उभी राहिली. ( उघड ) •कसलं आलंय तुजवरील प्रेम ! मनुष्याला ओळखीत नाहींस, तुला वेडबिड तर नाहींना लागलं ? चल चालती हो, माझा तुझा कांहींएक संबंध नाहीं.

नलिनी— ह्या तुझ्या कृतीचा मला मोठाच चमत्कार वाटतो. इतके दिवस माझ्यावर—ह्या आपल्या प्रियकर नलीनी-वर जीव कीं प्राण करून आतां ती तुझ्या मनांतून उतरली अं ? गुलाब, तुझ्याकरितां मी आपल्या बापाच्या सुद्धां मर्जी-विरुद्ध गेलें, तुझं माझ्यावरील निःसीम प्रेम पाहून कित्येक लोक दूषण देतील याची सुद्धां फारशी पर्वा बाळगली नाहीं. आपल्या प्रीतीतरूला फळं आलेली पाहण्यांत तुला मोठा आनंद होईल, असं मला फार वाटत होतं, तें कांहींच न होतां असा माझा धिक्कार करतोस, तर मी अशा स्थितींत कुणाचें साह्य मागावें ? कुणावर भिस्त ठेवून आपला काळ कंठावा ? छे. छे. गुलाब, अशा रीतीनें एखाद्याला फसविणें तुला योग्य नाहीं.

गुलाब—तूं कुणी तरी शुद्र बाजारबसवी, एखाद्या संभावीत मनुष्याच्या माथीं नसतं पाप लावून, त्याला खड्यांत आणूं पाहतेस. पण संभाळ, हें मला मुळींच आवडायचं नाहीं, तुझ्यावर माझें प्रेम ? कधीं जन्मांत सुद्धां तुझें माझें दर्शन नाहीं. असलीं खोटीं भाषणं करायला तुला शरम कशी नाहीं वाटत ! चल चालती हो.

नलिनी—गुलाब, काय हें ! ह्या सर्व कृत्याला आपणच कारणीभूत होऊन पुन्हां असलीं भाषणें करतोस, याला

काय ह्मणावें. आतांच तुझ्या वृत्तींत हा चमत्कारिक फरक कशानें पडला? माझ्या प्रेमाविषयीं नको, पण ह्या दीन अनाथ मुलाची तरी तुला करुणा येऊं दे. माझा बाप अगोदरच दुखण्यानें बिछान्याला अगदीं खिळलेला, घरांत अठराविस्वे दारिद्र्य, अन्नाला सुद्धां आह्मी महाग झालेलों, अशा स्थितींत ह्या लहानग्या कोमळ अर्भकाचे—गुलाब, प्रत्यक्ष आपल्या पोटच्या पोराचे हाल तुझ्यानें कसे मुकाट्यानें पाहवतात?

गुलाब—काय बदमाष रांड! खबरदार असले शब्द पुन्हां उच्चरलेस तर, माझा राग मला मुळींच सहन होणार नाहीं. मरेना का तो कारटा! त्याच्याशीं मला काय करायचें आहे!

नलिनी—त्याच्याकरितां नाहीं, तर निदान माझ्याकरितां तरी! गुलाब, आज इतक्या दिवसांत तुझ्या ह्या निष्ठुर स्वभावाची मला कल्पना सुद्धां नव्हती. जनापवादाची मनांतील भीती ह्या अर्भकाकडे पाहून मी सर्व बाजूला ठेवते. माझ्या सौख्याचें हेंच एक एवढें साधन उरलें आहे. त्याच्यावर असा हा गहजब उडाला तर दोघेंही प्राणाला मुकलों ह्मणायचें. गुलाब तुला मी हात जोडतें कांहीं तरी आमची दया येऊं दे.

गुलाब— तुझ्याशीं बोलायला मला मुळींच वेळ नाहीं. तूं इथून चालती हो, वाटेल तर त्याकडे पहात बैस, अथवा हवी तर मर. मला त्याची मुळींच पर्वा नाहीं. (तिला झिटकारून जाऊं लागतो, ती त्याच्या मागोमाग मुलाला घेऊन धांवते.)

नलिनी— गुलाब मकोरे असा माझा अंत पाहूं! माझ्याच्यानें ह्या हालांत आतां दिवस काढवत नाहींत.

दुःखानें क्षीण झालेलें हें कोमल पोर त्याची चांगली काळजी न ठेवली तर लवकरच तरफडून प्राण सोडील ! गुलाब, पूर्वी तुझी माझ्यावर किती प्रीती होती ! " तुझ्याकरतां चांगलं घर बांधून देऊन ह्या दीन स्थितींतून तुझी सुटका करीन " ह्मणून किती वेळ तरी तूं मला वचनें दिलीं होतीस ! ही गोष्ट कांहीं तरी लक्षांत आण. तुझ्या आतांच्या कृतीवरून ह्या गोष्टी निव्वळ स्वप्नवत झाल्या. पण निदान चांगलं औषधपाणी करण्याला तरी तूं कांहीं पैसा दे. माझा तुझ्यावर फार भरंवसा होता. गुलाब, पैशा शिवाय कसं होणार ? माझ्या गरीबीमुळें व तुझ्या अशा निष्काळजी पणामुळें ह्या अर्भकाचा जाणून बुजून तूं प्राण घेतलास असं होणार आहे. त्याचे हे हाल माझ्याच्यानें पाहवत नाहींत. तुझ्या कठीण हृदयाला कांहीं तरी द्रव येऊं दे. गुलाब तुला सोडून मी कुठें जाऊं ?

गुलाब—( तिचा सहवास नकोसा होऊन आपल्याशीं ) ही हडळ अशानें ऐकायची नाहीं. इच्यावर माझी पूर्वी प्रीती होती, पण आतां नाहीं. ही शोकानें बेफाम होऊन माझ्या ह्या दुष्कृत्याचा बोभाटा केल्यावांचून कधीं राहणार नाहीं. तर इचें पुनः दर्शन ह्मणून होणार नाहीं असें केलें पाहिजे. ( उघड रागानें ) पैका काय, पण कपर्दिक सुद्धां मिळायचा नाहीं. माझा राग अनावर करण्यांत कांहींएक अर्थ नाहीं. तुला आपल्या प्राणाची पर्वा असेल तर मुकाट्यानें इथून चालती हो. तुला मी निक्षून सांगतों, असला लचळपणा करून माझा वेळ घालविलास तर मला हें मुळीच खपायचं नाहीं.

नलिनी—( दुःखातिशयानें ) गुलाब, गुलाब, तुझें

काळीज इतकें दगडाप्रमाणें निष्ठुर असेल याची मला कल्पना सुद्धां नव्हती. काय हीं तुझीं भाषणं. अशा रीतीनें माझा घात करण्यांत तुला काय भूषण वाटतं ? माणसाला भरंवशावर ठेवून ऐन वेळेला त्याचा गळा कापणें, ह्यासारखी अधमपणाची कृती तुझ्याच्यानें खुशाल करवेल, ह्यावरून मनुष्यस्वभावाला तुझा स्वभाव ह्मणजे खरोखर अपवाद आहे असंच ह्मणावं लागतं. नाहीं, नाहीं. अशा रीतीनें मी कधींही परत जायची नाहीं, इथें तुझ्या पायांवर लोटांगण घेईन, सोक्षमोक्ष कायतो करून टाकल्याशिवाय मला कांहींएक सुचत नाहीं. कांहीं शुद्धीवर ये. असा बेफाम होऊं नकोस !— ( मुलाला त्याच्या समोर नेते. )

गुलाब— ( रागानें बेफाम होऊन ) हजारदां सांगून-सुद्धां त्याचा कांहींच परिणाम नाहीं. चाडाळणी, भोग आपल्या कर्माचीं फळें. ( असें ह्मणून रागाच्या सपाट्यांत त्याला जोरानें ढकलतो, त्यासरशीं जवळच्या झाडावर मुलाचें डोकें आपटून तें खालीं पडतें. )

नलीनी— ( तें पाहतांच शोकानें वेडी होऊन मोठ्यानें ) हायहाय, अगआईग ! ( क्रोधानें लाल होऊन ) अरे, अधमा, किती अघोर कर्म हें ! चांडाळा, अशा रीतीनें माझ्या ह्या कोमल लेकराचा घात करून दुष्कृत्याचा अगदीं कळस केलास ! अनाथ, निरपराधी, अजाण अशा मला आपल्या जाळ्यांत पकडून, नाहीं नाहीं त्या भुलथापा देऊन, मांगा, शेवटीं माझा जन्माचा सत्यनाश कीं रे केलास ? तुझ्या ह्या दगडाहून कठीण हृदयाला खरोखर दुसरी कशा-चीच उपमा नाहीं. ( त्याच्या मागें धांवत जाते ) आतां मला परत जाण्यांत काय अर्थ ! ( दोघेहीं समोरच्या एका मोठ्या

पुलावर येतात. ) आतां मी तुला कधींही सोडायची नाहीं. ज्याच्यावर माझा अगदीं जीव कीं प्राण, त्याचा असा क्रूर-पणानें शेवट झाला. आतां माझं असं मला काय उरलं आहे? मी तुझा पिच्छा कधींही सोडणार नाहीं.

गुलाब— ( ती जात नाहीं असें पाहतांच रागानें ) तुला निक्षून सांगतों. मी आतां अगदीं बेफाम झालों आहे ? या वेळेला काय करीन आणि काय नाहीं याचा कांहींच नियम नाहीं. तूं अशा रीतीनें मला त्रास द्यायला लागलीस, तर त्या कारट्याची जी वाट लागली तशीच तुझीही लागेल. तूं जा, आतां तरी इथून चालती हो. मला तुझा प्राण गेल्यास सुद्धां दया येणार नाहीं.

नलिनी—( आवेशानें रडत ) काय माझा तूं प्राण घेणार ! ठीक आहे. ही मी मृत्यूला एका पायावर तयार आहे. काय वाटेल तें कर. मी इथून मुळीं सुद्धां हालायची नाहीं.

गुलाब—( मोठयानें ओरडून ) तूं जा, इथून निघून जा. तुझा सहवास–तुझें दर्शन मला असह्य झालें आहे. मी खात्रीनें सांगतों, जास्त एक क्षणभर जर इथें उभी राहिलीस तर तुझाही प्राण घेतल्याशिवाय मी कधींही राहणार नाहीं.

नलिनी—त्याचीच मी वाट पहात आहे. पण ध्यानांत ठेव, आपल्या अघोर कर्माचीं फळें तुला जरूर भोगावीं लागतील.

गुलाब—( त्रासून ) नको आसा त्रास देऊं. तुला पुन्हां सांगतों, तूं जा—जा–

नलिनी—नाहीं, नाहीं. मी कधींही जायची नाहीं.

गुलाब—काय ! नाहीं तूं परत जात ? ध्यानांत ठेव.

नलिनी—किती वेळ आतां सांगूं ? नाहीं. मी मुळींच जायची नाहीं.

गुलाब—नाहीं आत ? घे तर आपल्या अविचारीपणाचें प्रायश्चित—

( गुलाब नलिनीला रागानें उचलून, पुलावरून खालीं ढकलून देतो. त्यासरशीं नलिनी मोठ्यानें किंकाळी फोडून खालीं अथाक पाण्यांत धाडकन पडते—)

अंक १ ला समाप्त

## अंक २ रा

## प्रवेश १ ला.

स्थळ—कांचनपूरच्या वेशीजवळचें एक घर.

( रणधीरराव व दौलतराव गोष्टी बोलत बसले आहेत असा प्रवेश होतो. )

रणधीरराव—ती कांहीं अशी मोठी मालमत्ता आहे असं नाहीं, पण आहे आपली कसा तरी चरितार्थ चालवायला कमी नाहीं एवढंच, आणि तिची अंमळ चागल्यारीतीनें काळजी घेतली ह्मणजे तीच फायदेशीर होते.

दौलतराव—हें तर खरंच. आह्माला आपलं असं कांहीं तरी करून ठेवण्याची शक्कलच सुचली नाहीं. आमचा सारा जन्म गलबतावरच गेला.

रणधीर—मग त्यांत काय वाईट झालं. आपली नोकरी

ह्मणजे फार मानाची होती. जहाजावरील मुख्य कप्तान ह्मणून सर्व लोक अपल्याला चाहत होते.

दौलत०—हो, पण तिचा कंटाळा येऊन ती सोडली तर दुसरा कांहीं तरी आश्रय ह्मणून हा धंदा अपला चांगला, कुठें जायला नको, कीं यायला नको.

रण०—त्यांत सुद्धां पुष्कळ भानगडी असतात, पण आमचा जमीनदार चांगला असल्यामुळें तो आह्माला कांहीं विशेष त्रास देत नाहीं एवढंच.

दौलत०—हो, पण कायहो, काल आपण फिरायला जात असतां वाटेंत त्याठिकाणीं आपणाला जे दोघेजण भेटले, ते कोणहो ? त्यांत एक मुलगी होती ती कायपण सौंदर्याची केवळ पुतळी होती. तिच्यासारखी स्वरुपवान स्त्री आपण तर आजपर्यंत पाहिली नाहीं.

रण०— ती कुसुम ! आमच्या जमीनदाराची मुलगी. ते ह्मणजे बरेच वर्षांपासून इथें आहेत असं नाहीं. काय सारीं दहा वर्षें झालीं असतील नसतील पण आले तें एकदम श्रीमंती उचलून आले ह्मटलें पाहिजे. या शहरांत सर्वांत मोठी अशी जी मालमत्ता ती आल्याबरोबर त्यांनीं लागलीच विकत घेऊन स्वतःकरतां राहण्याला चांगला टोलेजंग वाडा बांधुन जिकडे तिकडे अगदीं ऐषआरामी थाट उडवून दिला, त्या मुलीच्या मागुन जाणारा तो तिचाच सावत्र भाऊ— आमच्या जमीनदाराचा लहान मुलगा. त्याचें नांव गुलाब.

दौलत०– ( साशंक होऊन स्वतःशीं ) दहा एक वर्षांपूर्वी एकदम श्रीमंती उचलून आलेला ! हो, त्या गोष्टीलाही सरासरी आज तितकींच वर्षें झालीं. त्यांतनी यांत मेळ बसण्याचा बराच संभव दिसतो. असो. ( उघड ) तिचा

तो भाऊ ह्मणतां पण त्याच्याशीं ती तिरस्कारानेंच भाषण करीत होती. त्यांचा स्वभाव तिला मुळींच आवडत नाहीं असं दिसतं ?

रणधीरराव—आपलं ह्मणणं ठीक आहे. आमच्या जमीनदाराच्या मनांतून त्या दोघांचें लग्न करून द्यायचें आहे, पण ती या गोष्टीला मुळींच कबूल नाहीं. तो गुलाब ह्मणजे फारच वाईट चालीचा आणि दुष्ट मनुष्य आहे, अशी सर्व गांवांत त्याची ख्याती आहे. तेव्हां तो तिला न आवडणें अगदीं साहजीक आहे. आणि खरोखरच त्याच्याशीं तिचें लग्न झाल्यास तिच्या बिचारीच्या जन्माचें मातेरें होईल, यांत शंका नाहीं.

दौलतराव— पण अशा रीतीनें तिच्या मर्जीविरुद्ध लग्न करून तो प्रत्यक्ष तिचा बाप तिच्या जन्माचें मातेरें कसें करील. स्वतःच्या पोरीविषयीं त्याला कांहींच कां काळजी नाहीं.

रण०— मुळीच नाहीं. घरांतल्या मंडळी संबंधानें त्याचें वर्तन चमत्कारिकच आहे. मोठ्याकुळांत जन्म झालेल्या, पण दारिद्र्यांत दिवस काढणाऱ्या अशा एका स्त्रीवर त्याच्या वडील मुलाचें मन बसल्यामुळें, ती गोष्ट त्याच्या मर्जीविरुद्ध ह्मणून आपल्या थोरल्या मुलाला त्यानें खुशाल घराबाहेर एक कपर्दिक न देतां घालवून दिले. आतां तो पोर चांगला ह्मणून त्याची लागलीच दुसरीकडे तजवीज लागली. एरवीं त्याची स्थिती फार वाईट होणार होती.

दौलत०— ह्मणजे फारच चमत्कारिक मनुष्य ह्मणायचा ! पोटच्या गोळ्याहून सुद्धां त्याला पैसा जास्त महत्वाचा वाटला तर !

रण०— हो. तो द्रव्याकरितां खरोखर हापापलेला आहे.

दौलत— ( स्वतःशीं ) द्रव्याकरतां केवळ हापापलेला ! ही संशयाला दुसरी जागा. ( उघड ) बरं रणधीरराव, तो रहातो कुठें ?

रण०—अगदीं जवळ. शिंद्यांचा वाडा म्हणजे कांचनपुरांत चांगला प्रसिद्ध व पाहण्यासारखा आहे. तुह्माला पाह्यचा असेल तर मी दाखवीन.

दौलत०—( एकदम चपापून ) काय ! शिंद्यांचा वाडा ! त्या तुमच्या जमीनदाराचं, एकदम श्रीमंत होऊन आलेल्या गृहस्थाचं, नांव काय शिंदे ?

रण०—हो. शिंदे. पण त्याबद्दल आपल्याला असं आश्चर्य तें काय वाटलं ! त्यांचं नांव ऐकून जे तुह्मी अगदीं चकित झालांत, तो तुमच्या पूर्वीचा कोणी तरी चांगला ओळखीचा असावा, असं वाटतं.

दौलत०—ओळखीचा वाटतो खरा, पण एव्हांशींच खात्री नाहीं देता येत. पण माझ्या मनांत आहे, तोच जर हा असेल तर खरोखर फार चागलं होईल. पण कायही, त्यांचं नांव काय ? तुह्माला माहीत आहे का ? कसा मनुष्य आहे तो ? अंगापिंडानीं, रंगारूपांनीं ?

रण०—अंगापिंडानीं चांगला सशक्त, आडदांड, रंगारुपांनीं सुरेख-देखणा, वयानें पंचेचाळीस-शेचाळीस, आणि नांव जाधवराव.

दौलत०-( ज्यास्त खात्री पटून ) काय जाधवराव शिंदे ! अंगापिंडांनीं सशक्त, रुपांनीं चांगला देखणा, आणि वय काय ह्मटलं पंचेचाळीस शेचाळीसाच्या जवळ जवळ !

रण०-हो, कां बरं ?

दौलत०—नाहीं, याच नांवाचा एक मनुष्य माझ्या चांगला माहीतींतला आहे. कदाचित तोच हा आहे कीं काय अशी शंका येते. पण तो नसावा, कारण तो मनुष्य इतका श्रीमंत नसून मेहनत करून उदरनिर्वाहाला मिळविणाऱ्या पैकीं होता. दहा एकवर्षांचीच मागची गोष्ट, आमच्या जहाजावरील मुख्य कप्तानाचें काम त्याचेकडे होतें.

रण०— बराचसा उलाढालीचा व्यापार करून शिंद्यानें ही संपत्ती मिळविली, असं आपले लोक ह्मणतात. आणि हें खरंही असेल. तशा व्यापारांत साधल्यास पैशाला कांहींच कमताई नसते. हल्लीं त्याच्याजवळ सर्व मिळून तीसचाळीस लक्षांची संपत्ती आहे.

दौलत०—आणि ही इतकी संपत्ती त्यानें कशारीतीनें, कुठून मिळविली, याविषयीं कांहीं वदंता नाहीं का तुमच्या कानांवर आली ? कीं तो जन्मताच श्रीमंत होता ?

रण०—हें सांगणें कठीण आहे, ह्या शहरांतील लहान थोर गरीब श्रीमंत तसेच जवळपासच्या आणखीं कांहीं गांवांत सुद्धा, जाधवराव शिंदे इथें येण्यापूर्वींची त्यांच्याविष-यींची माहीती जाणणारा मला नाहीं वाटत कुणी असेल ह्मणून. एक वेळेस समखी सारखी मंडळी मिळून आमची एका ठिकाणीं बैठक झाली होती, तिथें गोष्टी निघतां निघतां सहज या विषयींही गोष्ट निघाली. तेव्हां आमच्यापैकींच एकजण दुसऱ्याला ह्मणाला " कायहो, या जाधवराव शिंद्या-विषयीं कांहीं कुणाला माहिती आहे का ? " तेव्हां दुसरा ह्मणाला ' जाधवरावाविषयीं माहीती ! त्याची माहीती ज्यानें त्याला निर्माण केला त्यालाच कदाचित असल्यास न कळे, बाकी ह्या जगांत तरी कुणाला असेल असं मला नाहीं वाटत, तो

मनुष्य ह्मणजे ज्याला आदि नाहीं आणि अंतही नाहीं, असाच कुणी तरी असला पाहिजे.' आणि दौलतराव, त्याचें ह्मणणें कांहीं खोटें नाहीं. जाधवराव शिंद्याचा अंत कदाचित पुष्कळांना माहीत होण्याचा संभव आहे, पण तो आला कोठून, त्याजवळ इतकी संपत्ती कोठली, हें कांहींच माहीत असणें कुणाला शक्य नाहीं. तुम्हाला त्याविषयीं शंका येते, त्याचें नांव पूर्णपणें माहीत असल्याचें तुह्माला आठवतें, त्याविषयीं तुह्मी इतकी खोदखोदून मुद्दाम माहिती विचारतां, यावरून त्याच्याविषयींचा पुरा तपास तुह्मीच लाऊं शकाल असं मला वाटतं. तुह्मांपासूनच ह्या गूढ प्रकरणाचा लोकांना खुलासा होण्याचा संभव आहे.

दौलत०—संभव ह्मणून नाहीं. पण त्याविषयीं मी खुलासा मात्र काढण्याचा प्रयत्न जरूर करीन आणि दुसऱ्याही एका कारणावरून तो मला केलाच पाहिजे. तो इथें येऊन अशा रीतीनें राहिल्याला काय दहा एक वर्षे झालीं ह्मणतां?

रण०—हो. इतकींच. यापेक्षां जास्त नाहींत. एकजण सफाई बुडायला व दुसरा तिथें येऊन जमायला ती एकच गांठ पडली होती. हल्लीं जाधवराव शिंद्या सारखा श्रीमंत आसपास क्वचितच कुठें सांपडेल.

दौलत०— रणधीरराव, माझ्या कामा करतां या मनुष्या विषयीं मला आणखीं कांहीं माहीती पाहिजे आहे. तो कसा येऊन राहिला, पुढें काय काय झालें याची साधारण माहीती मिळाल्यास ठीक पडेल.

रण०— मला जी माहीती आहे ती एवढीच, याहून जास्त पाहिजे असल्यास आपण स्वतः त्याची भेट घेतल्या शिवाय व्हायची नाहीं.

दौलत०— मलाही असंच वाटतं. हा मी तिकडेसच जातों. बरं पण त्याचा वाडा कुठेंसा आहे ह्मटलं ?

रण०—ह्या रस्त्यानें समोर गेलें ह्मणजे कांहीं वेळानें विलास-बाग लागते, त्या समोरून डाव्या हातांवर जाणाऱ्या हनुमान रस्त्यावर कुणालाही विचारलें असतां सहज सांपडेल.

दौलत०–चिंता नाहीं. मी जातों आतां तिकडे.

रण०—संध्याकाळीं फराळाला इकडेसच यायचं.

दौलत०—ठीक आहे.( समोर येऊन स्वगत ) तोच तो पाजी, हरामखोर, जाधवराव शिंदे एकाच वयाचे, एकाच नांवाचे सारखे दोन मनुष्य असणं संभवनीय नाहीं. शिवाय तो इथें आला ती वेळ, त्याची उंच मजबूत शरीर काठी, त्याची पैशाकरितां हांव इत्यादि सर्व गोष्टी बरोबर जुळतात. कांहीं असो. आज मी त्याची भेट घेणारच. त्याला पाहून जरी आज बरीच वर्षें झालीं आहेत, तरी त्याला मी सहज ओळखूं शकेन. आणि जर तो हाच विश्वा-सघातकी असला तर त्यावर चोरीचा आळ आणून चहूंकडे त्याची बरीच फजीती केल्यावांचून राहणार नाहीं. चला तर लवकर तिकडे गेलें पाहिजे.

( निघून जातो. )

**प्रवेश १ ला समाप्त**

---

# प्रवेश २ रा.

स्थळ—जाधवराव शिंद्याचा वाडा.

( जाधवराव एकटाच विचारांत बसला आहे. )

जाधवराव—( स्वगत ) तें मृत्युपत्र मीं केल्यापासून माझ्या अंतःकरणांत बराच फरक पडला आहे. तो तसा न पडावा-आपलें धैर्य कायम रहावें ह्मणून मी कितीतरी यत्न करतों, पण ते सर्व निष्फळ होतात. मदनाला घरांतून घालवून देऊन ह्या संपत्तीचा मालक मीं गुलाबला केला, पण तेव्हांपासून माझा पैसाच मला सोडून गेला असें वाटतं. गुलाबनें माझ्या पैशाची वाटेल तशी वाताहात करून ही एवढी थोरली मालमत्ता, तसाच हा टोलेजंग वाडा पण धुळीला मिळविला, अशा प्रकारचीं स्वप्नें मला अलीकडे नेहमीं डोळ्यापुढें दिसतात. कालचं स्वप्न तर सर्वांहून वाईट. माझ्या सर्व गुप्त कृत्याचा एकाकीं परिस्फोट होऊन माझी जिकडे तिकडे फजीती झाली, सर्व जणांनीं मला धिक्कारून जगांत तोंड काढायला सुद्धां जागा ठेवली नाहीं, आणि अखेरीस माझ्यावर चोरीचा आळ आणून बळजबरीनें मला तुरुंगांत नेलें. तें पाहून एकदम दचकून मी जागा झालों, गड्याला पुष्कळ हांका मारल्या, पण कुणीही ओ देईना. अस्वस्थ झालेलें माझें मन ठिकाणावर आणण्याचा मी यत्न करूं लागलों, पण तसें न होतां जिकडे तिकडे मला भीतीच भीती वाटायला लागली. अशा रीतीनें थोडा वेळ गेला असेल नसेल तोंच फिरून माझा किंचित डोळा लागला, तो फिरून स्वप्न आपलं तयारच ! त्यांत पहाटेस पडलेल्या स्वप्नानें तर

माझी फारच त्रेधा उडाली. कुणी तरी अचानक त्या काळो-खांत येऊन आपल्या तीक्ष्ण कट्यारीनें माझा खून करीत आहे असं मीं पाहिलं. तो गृहस्थ कोण, हें मात्र ओळखतां आलं नाहीं. हरहर, काय हें! खरोखर याचा परिणाम कांहीं ठीक दिसत नाहीं. ( थांबून ) पण हें असं कां बरं-व्हावं ? हा इतका पैसा जेव्हां एकदम माझ्या डोळ्यांसमोर दिसला, तेव्हां आपला हक्क यांतल्या एका पैवर सुध्धां नाहीं, ही गोष्ट माझ्या पूर्णपणें लक्षांत होती. दुसऱ्याचा पैसा आप-लाच आहे असं समजून त्यावर खुशाल चैन मारण्यानें— आणि तोही विश्वासघातासारखें भयंकर कृत्य करून उपभोगिल्यानें अखेरीस नरकाचें साधन खास होतें, ही गोष्ट तेव्हां किती वेळ तरी माझ्या चित्ता-समोर उभी राहिली ! चांगलं आणि वाईट हें समजण्यापुरती त्या वेळेस माझ्या अंगांत विचारशक्ती नव्हती असं नाहीं; पण ह्या सर्वांवर विरजण पाडणाऱ्या अजब द्रव्यलोभाचें आवरण पडून माझ्या अंतःकरणांतील सुविचारांना त्यानें खालीं दडपून टाकलें, मला कळत असू-नही मी अजाण झालों होतों ? ( इतक्यांत एक पहारेकरी येतो. ) कायरे ! काय खबर आहे ?

पहारेकरी—दारावर एक दिसण्यांत चांगले संभावीत असे गृहस्थ कांहीं जरूरीच्या कामाकरितां आले असून आपल्या भेटीची इच्छा करताहेत.

माधव०—असं काय ? त्यांना जरूरीचें काम आहे ?

पहा०— तें मीं त्यांना विचारलं, पण काय तें त्यांनीं कांहीं सांगितलें नाहीं. 'आपल्याच धंद्यासंबंधानें आहे' एवढं मात्र ते ह्मणाले.

जाधवराव—माझ्याच धंद्यापैकीं आणि जरूरीचें काम ! ( स्वगत ) या वेळेला माझें मन अस्वस्थ असल्यामुळें कुणाचीच भेट घ्यावीशी मला वाटत नाहीं. पण धंद्यासंबंधीं काम ह्मणजे माझ्या फायद्याची गोष्ट. ती कशी मला सोडतां येणार. ( उघड ) ठीक आहे, दे त्यांना आंत लावून. ( पहारेकरी जातो. ) पण, अशा प्रकारचीं कर्में करून शेवटीं त्याचें यथायोग्य शासन भोगणारा मीच एकटा या जगांत असेन काय ! नाहीं. पैशांनीं गरम दिसणाऱ्या कित्येकांची स्थिति माझ्या सारखीच असेल, दुसऱ्याला न दर्शवितां आंतल्याआंत ते असे माझ्यासारखेच पश्चात्तापाग्नीनें जळत असतील ! आणि अशा गोष्टी या काळांत न घडल्या-हा कलीचा फेरा मनुष्याची बुद्धी पापकर्माकडे वळविल्या-बांचून राहिला तरच त्यांत नवल.( दौलतराव प्रवेश करितो ) कसं काय कोणत्या उद्देशानें आलांत आपण?

दौलतराव—( जाधवरावाला निरखून पाहून स्वतःशीं ) तोच हा. जहाजावर असतांना आपल्या हातांखालील माण-सांवर मोठ्या प्रौढीनें हुकूम फर्मावण्याची त्याची शैली तशीच कायम आहे. वयाला वर्षें जास्त झाल्याकारणानें जरी हा थोडासा मोठा दिसत आहे, हे काळेभोर केंस जरी कालमानानें पहातां मधून मधून पांढरे झाले आहेत, तरी चेहरा अगदीं खात्रीनें तोच. त्यांत फरक मुळींच पडला नाहीं. याच्या अंगांतली शक्ती कमी झाली, पण त्याबरोबर त्याचा मनोनिग्रह कमी न होतां उलट जास्त वाढला, हें त्याच्या चेहऱ्यावरून सहज लक्षांत येतें.

जाधव०—कायहो, असे तिष्ठत स्वस्थ काय बसलांत ? काय काम आहे माझ्याशीं आपल्याला ?

दौलत०—छे. स्वस्थ बसण्याची कांहीं जरूर नाहीं. मला आपल्याला एक प्रश्न विचारावयाचा आहे, आणि त्याचें उत्तर माझ्या मनाप्रमाणें मला मिळालेंच पाहिजे.

जाधव०—ह्मणजे! ही कोण प्रश्न विचारण्याची तऱ्हा! तुह्मी कठें आहां हें तुमच्या लक्ष्यांत आहे ना?

दौलत०—हो. आपल्यासमोर बसलों आहे. जाधवराव, कुसुमपुराहून निघालेल्या जहाजावरील एका मरणोन्मुख झालेल्या गृहस्थानें विश्वासून आपणांजवळ दिलेल्या रत्नांची आपण काय वाट लावलीत?

जाधव०—( एकदम चपापून आलेल्या गृहस्थाकडे निरखून पहातो. स्वगत ) माझें डोकें असं एकदम फिरायला कां बरं लागलं! माझी शक्तीही कशी नाहींशीं होत चालली! मी पडेन कीं काय याची मला भीती वाटते! हं असं कां बरं व्हावं? हा कोण आहे, कांहींच कळत नाहीं. याच्या एका प्रश्नानेंच माझ्या काळजाचें पाणी झालें. माझ्या अंगाला दरदरून घाम सुटला. ( थांबून ) छे, पण मी या वेळेला एकटा नाहीं, हें मीं विसरतां कामा नये. अगदीं परका, अविश्वसनीय असा गृहस्थ माझ्या सान्निध्याला आहे; तेव्हां अंगांत चांगलें धैर्य आणून होता होईल तों मला शुद्धीवर असण्याचा प्रयत्न केला पाहिजे.

दौलत०— विचारलेल्या प्रश्नाचं अजून उत्तर नाहीं ह्मणजे मोठें आश्चर्यच ह्मणावयाचें! कुठें आहेत तीं रत्नें? ज्याची त्याला न देतां आपण तीं सर्व विकून हें ऐश्वर्य मिळविलंत कीं काय! बोला लवकर.

जाधव०— ( स्वगत ) माझ्या मनांत नुकत्याच आलेल्या विचारांचें ऐक्य होऊनच त्याला हा नरदेह प्राप्त झाला कीं

काय असें वाटतें ! पण अशारीतीनें माझ्या हृदयावर पडलेले-घांव आपल्या शद्बाघातांनीं विदारून टाकणारी ही स्वारी कोण ! आणि याला मीं आंत तरी कसं येऊं दिलं ! ( उघड ) आपल्या ह्मणण्याचा अर्थ मला समजला नाहीं. काय ह्मणालात आपण ? आपलं नांव काय आहे !

दौलत०— जाधवराव, माझ्या ह्मणण्याचा अर्थ आपणाला समजला नाहीं ह्मणतां, ही गोष्ट अगदीं खोटी आहे. कारण आपला चेहराच मुळीं तसं सांगत नाहीं. तरी चिंता नाहीं मी हें सर्व खुलासेवार आपणाला सांगतों. ह्या गोष्टीचा अखेरपर्यंत तलास लावावा असा माझा कृतसंकल्प आहे. आपण मला ओळखता का ?

जाधव०—नाहीं, कधींच आपल्याला मीं पाहिलेलं नाहीं.

दौलत०— नाहींच, आपली ओळख न देणं, हेंच या वेळेला तुह्माला रास्त, पण जसें तुह्मी माझ्या, तसाच मीही तुमच्या पूर्ण ओळखीचा आहे, माझें नांव दौलतराव. सरासरी दहा एक वर्षामागें कुसुमपुराहून निघणाऱ्या ज्या जहाजांवर मुख्य कप्तानाचें काम तुमच्याकडेस होतें त्यांच जहाजावरचा मी आपल्याच हाताखालचा अंमलदार. आपल्या पूर्ण माहितींतला आहे. सरासरी अर्धा एक वाट चालून झाल्यावर त्या आसन्न मरण असणाऱ्या मनुष्यानें आपला अंतकाळ समीप आला असें पाहून ज्या वेळेस आपणाला तीं रत्नें दिलीं त्या वेळेला मी जवळच होतों. जवळपास तिसरें मनुष्य कुणीही नाहीं. असं समजून तुमचीं निर्धास्तपणें चाललेलीं भाषणें बाहेरच्या बाजूस अगदीं नजीक असलेल्या मला इत्थंभूत ऐकायला मिळालीं. कायससं एक यंत्र साफ करीत मी बसलों अस-

तांना, आपण त्याजवळ आपला शब्द शेवटपर्यंत पाळण्याबद्दल घेतलेली शपथ ऐकून, ती आपल्याकडून कितपत शेवटास जाईल, याविषयीं मला बरीच शंका वाटली; पण ती तशीच शेवटास नेण्याची ईश्वर आपणाला सद्बुद्धी देवो, एवढी मी मनापासून इच्छा करून त्यावेळेस स्वस्थ बसलों. जाधवराव, ती आपली शपथ तुह्मी ह्मटल्याप्रमाणें पाळलीना? पैशाच्या लालचीनें विश्वासघातासारखें नीच कृत्य तुमच्या हांतून नाहींना घडलं? आशेनें बद्ध झालेल्या मनुष्याचा एकाएकीं प्राण जाणं फार वाईट ह्मणतात. त्याचा आत्मा निरंतर हवेंत भ्रमण करून आपलें इच्छित तडीस गेलेलें पाहिल्याशिवाय कधींही मुक्तीप्रत पावत नाहीं. त्या मृत मनुष्याचें जर कांहीं असेंच झालं असेल, तर जाधवराव, त्याच्याशीं बेइमानी करणाऱ्याची खरोखर भयंकर दुर्दशा उडेल, यांत शंका नाहीं. आपल्या हांतन असं नाहींना कांहीं झालं?

जाधव०—( स्वगत ) हें मी आज काय पहातों! मी हें काय ऐकतों! आशेनें बद्ध झालेल्या मनुष्याचें पिशाच आपली इच्छा तडीस गेलेली पाहीतोंपर्यंत कधींही नाहींसें होत नाहीं! त्या यशवंतरावाच्या इच्छेप्रमाणें—माझ्या हातून-नाहीं, कांहींच झालं नाहीं! मग काय यशवंतरावाचें पिशाच मला छळणार! ( दचकून ) नाहीं, असं नाहीं व्हायचं. ( विचारांत राहतो )

दौलत०—( स्वगत ) माझं काम मोठया शिताफीनें तडीस जाणार यांत शंका नाहीं. स्वारीच्या चित्तवृत्तींत विलक्षण फरक पडला आहे. माझ्या एकेक शब्दागणीक याच्या अंगावर शहारून कांटा उभा राहतो. प्रत्येक आठवणींतली

गोष्ट श्रवणीं पडतांच चेहरा काळाठिक्कर पडतो. खचित या अधमानें त्या बिचाऱ्याच्या अनाथ बायकापोरांची मान कांपून खुशाल आपली तुमडी भरली यांत शंका नाहीं. नाहींतर एकदम इतका पैसा येईल कुठला ! नुसत्या नोकरीवर अशारीतीनें श्रीमंत झालेला निदान माझ्या तरी पाहण्यांत नाहीं. असो, याचा परिणाम काय होतो, हेंही याला लवकरच समजेल. ( उघड ) जाधवराव, सांगा; काय खरं असेल तें सांगून टाका. पण आपण असे मध्येंच दचकता कां बरं ? दुसऱ्याचा पैसा हरण केल्यानें काय गती होते, याचें जें मीं वर्णन केलं, तें ऐकून आपली मुद्रा अशी कावरीबावरी कां बरं व्हावी ? मला संशय येतो. खरोखर तशारीतीनें होणाऱ्या शोचनीय स्थितीचा व आपला कांहीं संबंध तर नाहीं ना ?

जाधव०–( अंमळ धैर्यानें ) पण तुह्मी मला मोठेच चमत्कारिक मनुष्य दिसता. कदाचित तुह्मी ह्मणतां ती गोष्ट खरी आहे, असं जरी क्षणभर धरून चाललं, तरी त्याची सत्यता शोधून काढण्याकरतां तुह्मी मला येऊन प्रश्न विचारतां, यांत काय अर्थ ! खरं ह्मटलं ह्मणजे मजकडे न येतां त्या मृत मनुष्याच्या बायकोकडे जाऊन तीं रत्नें तिला मिळालीं कीं नाहीं, हें विचारणं रास्त.

दौलत०— तसंच मीं केलं असतं, पण मला तिचं नांव माहीत नाहीं.

जाधवराव— वः मग ही आपली फारच हुशारी समजली पाहिजे. न्यायकर्त्याची जागा आपणाला दिली तर त्याठिकाणीं आपण चांगले शोभाल, यांत शंका नाहीं. ज्याचं नांव सुध्धां पुरतं माहीत नाहीं त्या मनुष्याचीं रत्नें चोर-

त्याचा तुह्मी मजवर आरोप लादूं पहातां ? ही गोष्ट सत्याला कितपत स्मरून असेल याचा नीट विचार करा. दौलतराव, चोर सोडून सन्याशाला सुळीं देणें, हा केव्हढा वेडेपणा !

दौलत०— तें मला माहीत होतें, पण यवेळेला आठवत नाहीं, ह्मणून काय झालं ! खरं जर त्यामनुष्याचें द्रव्य हरण करण्याचें पाप तुमच्या माथीं बसलें असेल तर तें मजपासून लपवून ठेवण्यांत काय अर्थ !

जाधव०— हें पहा त्या संबंधीं तुह्मी ह्मणतां त्याप्रमाणें इतक्या बारीकसारीक गोष्टी तुह्माला माहीतअसून त्याचें मुख्य नांव आठवूं नये, ही गोष्ट संभवनीय तरी दिसते का ? असं काय करतां, नीट विचार करा.

दौलत०— ( स्वगत ) त्याचं नांव खरोखरच मला आठवत नाहीं. आणि ह्याच गोष्टीचा फायदा घेऊन आपल्या भाषणांत बराच जोर आणला. पण काय चिंता आहे, एव-ढ्यानं काय झालं ! बाकीच्या सर्व गोष्टी ऐकून याच्या वृत्तींत जो विलक्षण फरक पडला आहे त्यावरून बरीच सत्यता दिसून येते. आपली गुप्त गोष्ट बाहेर न येऊं देण्याचा यानें बराच प्रयत्न केला पण याच्या चेहऱ्यावरील विकारांनीं न कळत याचें सर्व कृत्य बाहेर आणिलें. त्या जहाजावरील ह्या दोघांचं झालेलं संभाषण मीं ह्या आपल्या कानांनीं ऐकलें आहे. अमोल रत्नांनीं भरलेली पिशवी या अधमाधमाला त्या हतभागी मनुष्यानें मरतेसमयीं दिलेली मीं प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिली आहे. मग फक्त त्याचें नांव मला या वेळेला आठवत नाहीं ह्मणून ही गोष्ट खोटी कशी ठरणार. छे, याची ही माहिती मिळवून या

गोष्टीचा कायतो निकाल केलाच पाहिजे. ( उघड ) बरं, पण तुह्मी या जहाजावरील मुख्य कप्तान होते ही गोष्ट तुह्माला कबूल आहे ह्मणायची.

जाधव०–निःसंशय, कुसुमपुरापासून निघणाऱ्या जहाजावर मुख्य कप्तानाचें काम एका वेळेस मजकडेस होतात ही गोष्ट मला मान्य आहे; पण तेवढ्याकरतां हा नसता आरोप माझ्यावर तुह्मी आणणं ही आश्चर्याची गोष्ट !

दौलत०—जाधवराव, बरं पण मी असं विचारतों कीं ही एवढी मोठी मालमत्ता व हें ऐश्वर्य विकत घेण्याला पुरेसा पैसा आपण कुठून आणलांत ? ह्याला बरीचशी रक्कम जवळ पाहिजे आहे; आणि ती आपल्या नोकरीच्या मानानें पाहिलें असतां आपणाजवळ राहण्याचा संभव नाहीं.

जाधव०—त्याचें कारण मी सर्व सांगतों. समुद्रांत जलपर्यटण करून जेव्हां मी किनाऱ्यावर उतरलों तेव्हां माझ्या नांवचें एक मोहोरबंद पत्र मला मिळालें मी रहात होतों त्या गांवीं एक जवळ जवळ कोट्याधीश असा गृहस्थ मृत्युशय्येवर टाकलेला असून त्याच्याकडून तें पत्र आलें होतें त्यांत त्यांनीं संपत्तीचा वारसदार असा त्यांना कुणीही नसल्यामुळें ती सर्व संपत्ती मला दिलेली होती. आह्मी व ते अगदीं जवळ जवळ राहत असन, माझें त्यांच्या इथें नेहमीं जाण येणें असल्यामुळें पोटच्या पोराप्रमाणेंच त्यांचें माझ्यावर प्रेम होतें. मीही त्यांना अगदीं बापाप्रमाणें मानीत असे. तें पत्र पाहतांच तसाच मी त्यांच्या अखेर भेटीचा तरी लाभ व्हावा ह्मणून त्यांचेकडे गेलों, तो त्यांची प्राणोत्क्रमणाची वेळ अगदीं जवळच आली होती. नंतर काय चार शब्द मला सांगायचे तें सांगून टाकून

आपली संपत्ती माझ्या ताब्यांत देऊन त्यांनीं प्राण सोडला. झालं. मला नोकरीचा कंटाळा आलाच होता, त्याच पैशांनीं मीही अनायासें विकायला काढलेली ही मालमत्ता घेतली. ही गोष्ट आजपर्यंत मी कुणालाच कळविली नव्हती; कारण एवढा श्रीमंत दिसणारा मी, जर कांहीं वर्षांपूर्वी यःकश्चित एक लहानशा जहाजावर कप्तान होतों, असं जर लोकांना सांगितलं असतं, तर तुमच्याप्रमाणेंच ती गोष्ट कुणालाही खरी वाटली नसती. मग सांगून तरी काय फायदा! दौलतराव केवळ माझ्या नशीबानेंच ही संपत्ती मला मिळाली. याकरितां आपण मनांत शंका आणतां तसलं कांहीं आचरण माझ्या हातून घडण्याचें काय कारण?

दौलत०–( स्वगत ) वः गोष्ट तर फारच टिकाऊ अशी बनिवली खरी. पण रत्नाचं नांव ऐकून जी ह्यांच्या हृदयांत विलक्षण कालवा कालव होऊन गेली, त्यावरून शंका घेण्याला जागाच उरली नाहीं. ( उघड ) जाधवराव, तुह्मी असं ह्मणतां त्यावरून तुमच्या ताब्यांत दिलेल्या रत्नांबद्दल तुह्मांला कांहींच माहीती नाहीं ह्मणायची!

जाधव०—छे. मुळींच नाहीं.

दौलत०—मग त्या मृतमनुष्याचें नांव सांगण्याला आपणाला कोणचीच हरकत असूं नये, ह्मणजे तें कळण्यास त्याच्या कुटंबाची भेट घ्यायला तरी ठीक पडेल.

जाधव०—नाहीं, मी तें कधींही सांगणार नाहीं. तें सांगून असली बेअब्रूपणाची गोष्ट त्याच्या कुटुंबांत पसरविण्याची संधी मी देईन, असं तुह्माला वाटतं तरी कसं? ही गोष्ट कधींही होणार नाहीं.

दौलत०—ठीक आहे, चिंता नाहीं. तुह्मी न सांगितलं

तरी मी तें शोधून काढीन; आणि जाधवराव हेंही मी तुह्माला सांगून ठेवतों, तुमच्याजवळ तीं रत्नें आहेत याबद्दल माझी पक्की खात्री आहे. तेव्हां त्याचा तपास लावल्यावांचून मी कधींही राहणार नाहीं तुह्मी सावध रहा.

जाधव०— ( रागानें ) मूर्ख अहात तुह्मी. मी तुह्माला फिरून सांगतों, मी तीं रत्नें पाहिलीं सुद्धां नाहींत. मल त्याबद्दल कांहींच माहीत नाहीं.

दौलत०— ( उठून ) आपलीं दोघांचीही सध्यां मतें अगदीं निरनिराळीं आहेत, तेव्हां त्यांची ऐक्यता झाल्याशि-शिवाय हा तंटा मिटायचा नाहीं. माझें ह्मणणें खरें आहे, हें आपणाला दाखविण्याचा प्रसंग मला लवकर कसा येईल. आणि त्या वेळेला मुकाट्यानें सर्व गोष्ट आपणाला कबूल केलीच पाहिजे. मी जातों आतां.

जाधव०— चिंता नाहीं, त्याविषयीं पाहतां येईल, ( दौलत-राव जातो. ) याला मी आंत कशाला येऊं दिलें! हा एकदम इतकीं वर्षें नाहीं आणि आजच कुठून आला! कांहीं असो, एक नवीच शत्रु मला निर्माण झाला यांत शंका नाहीं. काय करूं, माझ्या काळजाची कशी चोहोंकडून सारखी ओढाताण झाली आहे. नशीबाचा जोर होता तोंपर्यंत कोणत्याच प्रका-रचा त्रास झाला नाहीं. पण तेंच फिरल्याबरोबर हजारों शत्रू निर्माण झाले. नाहीं नाहीं त्या कल्पनेच्या बाहेरच्या गोष्टी घडून आल्या. आतां माझी कांहीं धडगत दिसत नाहीं. हा दौलतराव तोच हरामखोर आतां माझ्या पक्का लक्षांत आला. पण त्यावेळीं आमचा बेत इतक्या गुप्त रीतीनें चालला असतां ह्याला ती बातमी कशी समजली? ( विचार करून ) कशी समजली आणि काय समजली. समजली ही गोष्ट

खास आणि ती माझ्या नाशाला कारणीभूत झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. त्यानें उच्चारलेला एकेक शब्द तीरासारखा माझें हृदय विदारून आंत जात होता. ही बातमी कधींही उघडकीस आल्यावांचून राहणार नाहीं.' हे त्यांचे शब्द खरे झालेले ऐकायला सुद्धां मी जीवंत राहीन कीं नाहीं याचीच मला शंका वाटते. कृतकर्माच्या पश्चात्तापाच्या जबरदस्त भीतीमुळें माझ्या काळजानें अगोदरच ठाव सोडला होता. त्यांत त्या दौलतरावाच्या अचानक येण्यानें त्याचे तुकडे तुकडे झाले आणि अशा स्थितींत माझे हाल होऊन मी ह्या सर्वांला अंतरणार ! ( हातांनीं डोळे झांकून स्वस्थ राहतो. इतक्यांत कुसुम प्रवेश करते. )

कुसुम—बाबा, परवांपासून आपल्या जिवाला मुळींच चैन पडत नाहीं. (जाधवराव वर मान करून तिच्याकडे पाहतो ) आणि हें काय ? आपला चेहरा आज असा कां दिसतो ? बाबा, असे कावरेबावरे झाल्यासारखे काय पाहतां ? कशाची आपल्याला भीति वाटते आहे ? खरोखर इतका एकदम फरक पडायला तसेंच कांहीं तरी जबरदस्त कारण झालं असलं पाहिजे.

जाधव०—कांहीं विशेष नाहीं. कुसुम, आज सकाळीं तूं पर्वतेश्वराच्या दर्शनाला गेली होतीस, तिथली जत्रा कशी काय झाली ?

कुसुम—( कपाळाला आंठ्या घालून ) नाहीं कांहीं विशेष आनंदकारक झाली नाहीं.

जाधव०— कां बरं ? गुलाब तुजबरोबर होता ह्मणून कीं काय ?

कुसुम— नाहीं. आणखी ही इतर बराच त्रास झाला.

पण बाबा, आतां आपणाला भेटायला मनुष्य आला होता तो कोण हो ?

जाधव०— आला होता अशाच कांहीं पैशाच्या कामासंबंधीं. पण तुला विचारण्याची काय जरूर ?

कुसुम— बाहेरच्या दिवाणखान्यांत मी उभी असतां तो मजकडे मोठ्या क्रुद्ध मुद्रेनें पहात गेला, ह्मणून ह्मणते.

जाधव०— तो तसाच चमत्कारिक स्वभावाचा मनुष्य आहे. त्याच्या चयवर जर कधीं आनंद दृष्टीस पडला, तर तो त्यानें बळेंच आणला ह्मटला पाहिजे. व्यवहारांत सुध्दां तो मोठ्याच उलाढाली करणारा आहे.

कुसुम— काय असेल तें असो ! पण त्याची चर्या कांहीं विलक्षणच दिसली. आणि आपल्याही मुद्रेंत, बाबा, तेव्हां पासून चमत्कारिक फरक पडला आहे !

जाधव०—( रागानें ) असेल, त्याची कशाला हवी आहे तुला पंचाईत ! मी विचारतों त्या प्रश्नाचें उत्तर दे. गुलाबच्या व तुझ्या लग्नाचा दिवस होतां होईल तों लवकरच ठरवावा असं मला वाटतं. आजपर्यंत ह्या गोष्टींत मीं फारसें लक्ष दिलें नाहीं, पण आतां गुलाबच्या संमतीनें मला तो निश्चित केलाच पाहिजे. उगाच लांबणीवर टाकण्यांत काय अर्थ आहे.

कुसुम—( तिरस्कारानें ) गुलाब कदाचित आपल्या लग्नाचा दिवस तुह्माला सांगेल, पण त्यांत माझा कांहींच संबंध नाहीं. मी त्याच्याशीं लग्न करणार नाहीं.

जाधव०—कुसुम, तुझें हें उत्तर नेहमीचेंच आहे. आजपर्यंत पोरबुद्धी ह्मणून मी त्याकडे विशेष लक्ष दिलें नाहीं, पण आतां तुझ्या ह्मणण्याचा अर्थ माझ्या लक्षांत

आला. तो हरामखोर शिरक्या फिरून दुसऱ्यानें माझ्या इच्छे-आड येऊं पहात आहे ! कुसुम तूं मात्र ध्यानांत ठेव. ह्या सर्व गोष्टींचा चांगला विचार करण्याला तुला आणखीं एक महिन्याची मुदत देतों. त्यानंतर तुझें आणि गुलाबचें लग्न लागलंच पाहिजे.

कुसुम—( रागानें चवताळून ) हा कोण आपला हेके-खोर स्वभाव ! मी कधींही त्याच्याशीं लग्न करणार नाहीं. आणि मुलीच्या इच्छेविरुद्ध तिचें लग्न लावून देण्याचे ते पूर्वींचे दिवस गेले. तुह्माला वाटेल तसं तुह्मी ह्मणा, पण माझ्या इच्छेशिवाय जबरदस्तीनें मी जिवंत असतां माझें लग्न लावण्याला कोण आपणाला सल्ला देतो, हें मी पाहतें. खरोखर इतक्या थरावर गोष्ट आपण आणूं नये.

जाधव०—तूं आपला निश्चय अद्याप फिरवीत नाहींस ना ? ध्यानांत ठेव. मदनची जी स्थिती झाली, तीच तुझीही होईल. माझ्या इच्छेविरुद्ध एवढीशी सुद्धां गोष्ट ह्या जगांत झालेली मला खपणार नाहीं.

कुसुम—( रागानें ) ठीक आहे, त्याची मला मुळींच पर्वा नाहीं. जाधवराव शिंद्यांच्या केवळ अविचारामुळें एवढ्या सुखानें नांदत असलेल्या घराण्याची दुर्दशा उडाली, ह्मणून लोक आपणाला दूषण मात्र देतील याचाही कांहीं विचार करा. बाबा, याचकरतां कां आपण मला भेटून जा ह्मणून मधाशीं निरोप पाठविला ? गुलाबशीं मी प्राण गेल्यास सुद्धां लग्न करणार नाहीं, हेंच माझे यासंबंधींचे शेवटचे शब्द! आपण व्यर्थ आपल्या जिवाला त्रास करून घेऊं नये.

( रागानें निघून जाते. )

जाधव०— काय ? काय ह्मटलंस ? ( पहारेकऱ्यास ) कोण आहे रे तिकडे ?

पहारेकरी- ( येऊन ) जी सरकार, काय हुकूम आहे ?

जाधव०— जा. या क्षणीं गुलाबला मजकडे घेऊन ये.

( गुलाब प्रवेश करतो ).

जाधव०- गुलाब ती कारटी कुसुम अजूनपर्यंत माझ्या ह्मणण्याच्या विरुद्ध आहे. पण मी तुला सांगून ठेवितों, इथून एक महिन्याच्या आंत तिचं तुझं लग्न झालंच पाहिजे.

गुलाब— मग, मी कुठं नाहीं ह्मणतो ?

जाधव०— तूं तिला हरतऱ्हेनें वळीव. त्या कारटीचें मन शिरक्यांच्या त्या- भिकारड्या वसंतावर बसल्याचें अलीकडे माझ्या ऐकिवांत आलें आहे.

गुलाब— ( आश्चर्यानें ) काय ! त्या शिरक्यांच्या वसंतावर, आणि आपल्या कुसुमचें मन ?

जाधव०— हो, हो, त्याच शिरक्यावर त्यांचा सत्यानाश होवो. ह्या शिरक्यांचा नामनिर्देष सुध्दां जगांतून नाहींसा होता तर फार चांगलं झालं असतं !

गुलाब— बुडत्याचे पाय डोहाकडे ह्मणतात, त्यातलीच ही कुसुमची गती !

जाधव०— कांहींही असो तूं तिच्यावर चांगली नजर ठेव. तिच्याशीं लग्न ह्मणजेच तुला या जगांत सुखाची आशा हें विसरूं नकोस. माझें डोकें आज अगदीं फिरून गेलें आहे, मला अंमळ फिरायला गेलें पाहिजे.

( जाधवराव जातो. )

गुलाब—अरे राम ! काय हे बाबांच्या मनांत शिरक्याविषयीं वैर ! पण त्याचें कारण कांहींच समजत नाहीं.

मदनचा व मालतीचा विवाह झाला असतां तर कांहीं नुकसान नव्हतं. आतां कुसुमची संपत्ती विनाकारण दुसऱ्याच्या घरांत जाऊं नये, ह्मणून माझ्याशीं तिचें लग्न ही गोष्ट मात्र रास्त आहे आणि ती सर्वांना मान्यही होईल. असो. कुसुमजवळ आजच ही गोष्ट काढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आज बाबा संतापलेले, कुसुम संतापलेली, जिकडे तिकडे संतापच संताप झाला आहे, तेव्हां आज काय उपयोग ? ह्या प्रेमाच्या गोष्टींची बहार उडण्याला मन सुप्रसन्न पाहिजे.

( निघून जातो. )

**प्रवेश २ रा समाप्त**

---

# प्रवेश ३ रा.

---

स्थळ—रस्ता.

( वसंत प्रवेश करितो. )

वसंत— काय क्रूर कर्म तें ! असलीं अघोर कर्में आचरणारे यमस्वरूपी राक्षस नरदेहानें या जगांत वास्तव्य करतांना पाहून फार नवल वाटतं. अशांना खरोखर काळीज नाहीं, हेंच खरें. तसं असतं तर, ज्या योगानें पाषाणसुद्धां पार विरघळून जाईल, अहोरात्र नरबली देणाऱ्या मांगांच्यासुद्धां हृदयाला द्रव येऊन त्यांचाही हात एखादे वेळेस आपोआप आपल्या त्या नीच कर्तव्यापासून परांग्मुख होईल. ज्यांचें जन्मापासूनचें ईश्वरनिर्मित हाडवैर अशा क्रूर हिंस्र पशूंनासुद्धां त्यांचा नेहमींचा भक्ष्य जो मनुष्य त्याच्या अंतःकालच्या होणाऱ्या वेदना जाणवतील. पण असल्या नराधमांची कृती

ह्मणजे अगदीं विपरीत होय यांत शंका नाहीं. त्या अनाथ स्त्रियेला विनाकारण उचलून जलसमाधी देण्याकरतां त्या चांडालाचा हात धजला तरी कसा ! त्याच्या अघोरकृत्याव-रून त्याला नरदेह चुकून प्राप्त झाला असंच ह्मणावं लागतं. मी जवळपासच होतों ह्मणून बरें झालें. परमेश्वरकृपेनें मला चांगलें पोहतां येत असल्यामुळें त्या गरीब अबलेची मृत्युमुखांतून सुटका झाली, नाहींतर हां हां ह्मणतां त्या अथाक जलसमुहानें तिचा बळी घेतला असता ! अरेरे. परस्पर विरुद्ध अशीं कर्मे ह्या जगांत किती तरी नेहमीं होत असतात ! असो. आजचा दिवस मात्र खरोखर चमत्कारिक उगवला, माझ्या हांतून प्राण वांचविण्यासारखें एक सत्कृत्य आज घडल्यामुळें मला मोठी धन्यता वाटते. ( इतक्यांत समोरून दौलतराव प्र० करतो. )

दौलतराव— ( स्वगत ) माझ्या मनांतील सद्बुद्धीला सदैव जागृत ठेवून हातून खरें कर्तव्य घडविण्याला कारणी-भूत झालेलें हें कांचनपूरच यापुढें माझें वसतीस्थान होणार. त्या पूर्वीच्या स्थितीचा मला कंटाळा आला आहे. ( ऐकून ) हा समोरून कोण बरं येत आहे ! हा कोण बरं तरुणगृहस्थ असावा ! याच्या चेहऱ्याकडे पाहतांच माझें मन एकाकीं प्रेमानें आकर्षण कां बरें झालें ! माझ्या मनांत नानाप्रकारचे विचार एकदम येऊं लागले, हा काय चमत्कार ! ( जवळ जातो ) माझे डोळे मला फसवीत तर नाहींतना ! मी हें काय पाहतों !

वसंत— ( दौलत० उद्देशून ) काय हो, आपण असे साशंक दृष्टीनें मजकडे कां पाहतां ? माझ्याकडे पाहून आपण एकदम चपापलांत तें काय ह्मणून ? माझी व तुमची कधीं

यापुर्वी गांठ पडलेली मला नाहीं. आठवत आपलें नांव काय?

दौलत०—. माझें नांव दौलतराव. आपल्याला मीं पूर्वी कधींच पाहिलें नाहीं हें खरें, पण आपणाला पाहतांच माझ्या एका ओळखीच्या मनुष्याची मला एकदम आठवण झाली. त्याच्या चेहऱ्यांत व आपल्या चेहऱ्यांत असलेली साम्यता खरोखर कोणत्याही सारख्या वस्तूंत दिसायची नाहीं. आपणां-कडून हरकत नसेल तर क्षणभर मला आपणाबरोबर भाषण करण्याची परवानगी मिळावी.

वसंत— खुशाल बोला. काय आपणाला मला विचा-रायचें आहे? मला पाहतांच आपणाला एकदम कोणत्या तरी गत गोष्टीची आठवण झाली, यावरून आपणापासून मला बऱ्याच गोष्टींचा लाभ होण्याचा संभव आहे.

दौलत०—आपलं नांव काय आहे? कुठं रहातां आपण?

वसंत— माझं नांव वसंतराव शिरके. पूर्वीपासनचें राहण्याचें ठिकाण हें कांचनपूरच. कां बरें?

दौलत०—( आश्चर्यानें स्वगत ) काय शिरके! हेंच तें नांव! जहाजावर मृत झालेल्या गृहस्थाचें नांव यशवंतराव शिरके, मला आतां पक्कं आठवतें. परमेश्वरा, ह्या गृहस्थाची व माझी अचानक गांठ घालून माझ्या स्तुत्य अशा कर्तव्यांत मला तूं बराच साह्यकारी झालास. असाच शेंवटपर्यंत मला साह्य कर म्हणजे झालें. ( उघड ) काय हो वसंतराव, आपले वडील कधीं परदेशीं गेले होते कां? कांहीं व्यापार वगैरे करावा म्हणून?

वसंत— ( स्वगत ) हा असं कां बरं विचारतो? विचारतांना याचा हा उतावीळपणा तरी किती? माझ्या बाबासंबंधीं याला कांहीं तरी माहिती असावी. ( आनंदानें )

अहाहा ! आणि ती मला आज समजून ह्या गूढ प्रकरणाचा खुलासा होणार तर. ( उघड ) ते गेले होते खरे. व्यापार करून पैसा मिळविणें, हा त्यांचा मूळ उद्देश होता. पण आपण असें खोदखोदून विचारतां त्यावरून त्यांच्याविषयीं आपणाला चांगलीच माहीती आहे ह्मणायची. तसं असेल तर ती मला कळविल्यास फार उपकार होतील.

दौलत०—उपकार कसले. ती मला आपणाला कळ-वावीच लागेल.

वसंत— ठीक आहे तर. आज जवळ जवळ पंधरा वर्षें होत आलीं. मी त्यावेळेला अगदीं लहान होतों. तेव्हांपासून माझे वडील गेले, त्यांचा अजून पत्ता नाहीं. माझी आई त्यांचीं हकीकत ऐकण्याला फारच उत्कंठित झाली आहे, आपण मजबरोबर माझ्या घरापर्यंत चलण्याचे श्रम घ्याल तर तिथेंच सर्वांदेखत हा खुलासा होईल.

दौलत०—काय ! तुमची आई वगैरे सर्व मंडळी इथेंच राहतात ?

वसंत— हो. कां बरें ?

दौलत०— ठीक आहे तर. चला, मी खुशाल तिथ-पर्यंत येतों.

( जातात. )

( पडदा उघडतो. शिरक्याचें घर. मालती पत्र वांचीत आहे, जवळ कुसुम बसली आहे. )

कुसुम— मालती, पत्र वाचून तुला फारच आनंद झाल्या-सारखा दिसतो; असं आहे तरी काय त्यांत? कुणाचं पत्र तें ?

मालती— ( पत्र देऊन ) तुझ्यापासून लपवून ठेवण्या-सारखं कांहीं नाहीं हें घे वाच, ह्मणजे समजेल.

कुसुम— ( पत्र पाहून ) अस्सं, मदननें पाठविलेलें पत्र हें. तरी ह्मटलं अशा आनंदाच्या उकळ्या कां फुटता-हेत ! पण असं आहे तरी काय त्यांत ?

मालती— आतां आणखीं मला काय विचारत्येस. वाच ह्मणजे झालं. त्यापासून माझ्यापेक्षां सुद्धां तुला जास्त आनंद होण्यासारखा आहे.

कुसुम —( पत्र वाचते )' माझे प्रियकर मालती. मी, तुझा निरोप घेऊन तुझ्यापासून निघालों, तेव्हां माझ्या मनाला जो खेद वाटत होता, त्यापेक्षां आतां कितीतरी पटीनें जास्त आनंद व उत्कंठा तुझ्याकडे परत येण्याला मला वाटत आहे ! त्या वेळीं माझें मन आपल्या प्रियजन वियोगविरहानें अत्यंत व्याप्त असल्यामुळें ह्या दिशेला माझें पाऊल मोठ्या कष्टानें उचलत होतें पण तेंच आतां तुझ्याकडे मला किती तरी उल्हासानें व निमिष मात्रात आणील ह्मणून सांगूं. त्या वेळीं जो रस्ता मला अगदीं कंटाळवाणा वाटत होता, ज्या रस्त्यानें जातांना मन अस्वस्थ असल्यामुळें रमणीयता अशी कुठेंच आढळली नाहीं, तोच रस्ता आतां केव्हां हां हां ह्मणतां निघून जाईल याचें भान सुद्धां राहणार नाहीं. मालती, मजवरील प्रेमा-संबंधीं पत्रात जें तूं नेहमीं लिहीत असस, तें वाचून तुझ्या विषयीं मला काय वाटतें आणि काय नाहीं, हें मी लिहून दर्शविण्याला खरोखर असमर्थ आहे. बाबांनीं मला घालवून दिल्यामुळें माझें कांहीं एक नुकसान न होतां, उलट तिथें राहून माझ्या मनातील साहजीक वाढत जाणाऱ्या कर्तव्यपराङ्मुखतेच्या अनिष्ट परिणामापासून मी निर्मुक्त झालों , ह्मायोगें मला फार आनंद

होत आहे. मला इकडे आल्यानें पुष्कळ ज्ञान झालें. त्यांत माझ्यावर जी तुझी मी तिथें असतां प्रीति होती, ती तशीच कायम असलेली--किंबहुना.वृद्धिंगत झालेली पाहून प्रेमासंबंधीचे माझे विचार फारच विकास पावले, यांत शंका नाहीं. ईश्वरकृपेनें जें मला पाहिजे होतें तें मिळालें. आतां मी तिकडे लवकरच येण्याच्या विचारांत आहे. तुझ्या मुखकमलाचें दर्शन ह्या माझ्या नेत्रांना कधीं एकदां होईल असं मला झाल आहे. माझी खुशाली तूं आपल्या आईला व तशीच कुसुमलाही कळीव. बरकड मजकूर लिहिण्यासारखा नाहीं--" ( पत्राची घडी करीत ) मालती ! एकूण तूं मदनाला बरींच मोहनी घातली आहेस म्हणायची !

मालती---ही. वसंतावर तूं जितकी मोहनी घातली आहेस, तितकी मात्र नाहीं. दिवसांतून दोनवेळ गांठ पडल्याशिवाय व्हायचंच नाहीं. मी समजून आहे, आपली स्वारी अलीकडे नेहमीं नेहमीं इकडे कां येत असते ती !

कुसुम---हो. त्याशिवाय तुला दुसरं कांहींच दिसत नाहीं. तुझ्या सारखंच सर्वांचं नशिब थोर कुठें आहे ?

मालती--- कां ? नसायला काय झालं ? जाधवरावानां आपल्या अविचाराबद्दल पश्चात्ताप झाल्यावांचून कधींही राहणार नाहीं. गुलाबच्या क्रूर, निर्दय अंतःकरणावर त्याच्या मृदु कपटी भाषणाचें पांघरूण असल्यामुळें त्याचा खरा स्वभाव ते सहजरित्या जाणूं शकत नाहींत. पण ही गोष्ट ध्यानांत ठेव, त्याचीं भयंकर कृत्यें कधीं तरी उघडकीस येऊन त्याच्याबद्दलचा तुझ्या बाबांचा चांगला ग्रह खात्रीनें पालटेल, आणि तसं झालं म्हणजे मग तुझ्या अनहिताची गोष्ट जाणून बुजून त्यांच्या हांतून कशी होईल ?

कुसुम०— आजपर्यंत माझ्या मनांत कित्येक वेळां उद्भवलेल्या क्षणिक आशांकुराची ही केवळ पुनरावृत्ती आहे, याशिवाय कांहीं नाहीं. पण मालती ! मदन लवकर परत येणार हें ऐकून मात्र माझ्या मनाला फारच समाधान वाटलं. प्रबळशक्ती असलेल्या संजीविनी मात्रेप्रमाणें ह्या पत्रानें माझ्या जिवांतजीव आणला !

मालती— आणि माझ्या आनंदाला पारावार नाहींसा करणाऱ्या ह्या त्यांच्याकडील पत्राला मी आपल्या प्राणा-पलीकडे जपून ठेवीन.

( इतक्यांत एक दासी प्रवेश करते. )

दासी— ताई साहेब ! माई साहेब आपल्याला बाहेरच्या दिवाणखान्यांत बोलावताहेत.

मालती— कायग ! दादा आला कां बाहेरून फिरून ?

दासी— हो, आणि त्यांच्याबरोबर दुसरेही एक गृहस्थ आहेत.

कुसुम— मालती, मी येतें तर आतां.

मालती— ( दासीस ) बरं चल, हीं मी आल्येंच.

( कुसुम निघून जाते. )

( मनोरमा, वसंत, दौलतराव बसले आहेत, इतक्यांत मालती प्रवेश करते. )

दौलतराव—माझ्या येण्यानें आपल्याला कांहीं त्रास तर होण्याचा संभवत नाहींना ?

मनोरमा—मुळींच नाहीं. उलट कांहीं एक संबंध नसतां आपण इथें येण्याची तसदी घेतलीत व आमच्या करतां होईल तितका त्रास सोसण्याचें मोठ्या उदारबुद्धीनें अभिवचन दिलंत, यावरून आह्मी सर्व आपले फारफार

आभारी आहोंत ! आपण हातीं घेतलेल्या कृत्यांत वाटेल त्या रीतीनें साह्य करण्याचें वसंतानें कबूल केलेंच आहे.

दौलत०—वसंतराव आणि मी, उभयतां मिळूनच ह्या कार्यांत हात घालणार. त्यापासून झाल्यास आपला बराच फायदा होण्याचा संभव आहे. पण प्रथमतः मला आपणाला दुःखकारक अशी बातमी सांगण्याची पाळी आल्यामुळें फार वाईट वाटतें.

मनोरमा— वाईट गोष्टीबद्दल संशयांत राहून आनंद मानण्यांत तरी काय अर्थ आहे. जें नशीबी असेल तें भोगण्याला मनुष्यमात्रानें नेहमीं तयार असलें पाहिजे.

दौलत०— वसंतरावाच्या चेहऱ्याकडे पाहतांच दहाएक वर्षांच्या मागच्या गोष्टींचें मला एकदम स्मरण झालें. त्या-वेळेस मी एका जहाजावर नोकरी धरून होतों. कुसुम-पुराहून निघून सरासरी अर्ध्यावाटेंत आमचें जहाज आलें. तों त्यांत कोणी शिरके या नांवाचे गृहस्थ बराचसा पैसा संपादन करून आपल्या गांवीं परत जात आहेत असें मला समजलें. त्याचें नांव यशवंतराव शिरके.

वसंत— काय ! ते माझेच वडील ! ( थांबून ) पण कायहो, बराच पैसा मिळवून इकडेस येत होते ह्मणालात. मग पुढें काय झालें ?

दौलत०— काय सांगूं ! आपणाला दुःख मात्र होईल, पण सांगतोंच. अकस्मात कांहीं कारणानें त्यांचा वाटेतच मरणांत झाला. ( हें ऐकून सर्वजण दुःखी होतात, ) मरण-समयीं त्यांनीं मिळविलेली अपार संपत्ती तुह्मांला देण्याकरतां ह्या जाधवराव शिंद्याच्या स्वाधीन करून तसें करण्या-बद्दल याच्यापासून वचनसुद्धां घेतलें.

मनोरमा—( दुःखानें ) हा रे दैवा, अखेरीस इतके दिवस संशयांत ठेऊन माझ्या नशीबीं दुःखच लिहिलं होतंसना ?

वसंत —( खेदयुक्त रागानें ) बाबा, गेले, त्यांचा एका एकीं अंत झाला आणि आह्मां अनाथ पोरांवर दुःखाचा डोंगर तर कोसळला ! त्याबद्दल मला इतकं वाईट वाटत नाहीं, पण आह्माला प्राप्त होणारी संपत्ती, आमची मान कांपून ह्या जाधवरावानें—या नराधमानें खुशाल बळकावलेली ऐकून मात्र माझ्या आंगाचा नुसता संताप उडाला आहे. त्याबद्दल मी काय करूं ! त्याचा सूड घेणं हेंच रास्त. पण तो कसा घेऊं ? आमच्याशीं विश्वासघात केल्याबद्दल आतां जाऊन त्याचा खून करूं ! नको, पण ही एकदम झालेली शिक्षा, त्याच्या घोर अपराधाच्या मनानें कांहींच होणार नाहीं. त्याचे हाल हाल होऊनच तो ठार झाला पाहिजे. हें निलाजरें कर्म केल्याबद्दल त्याच्या मनाला अहोरात्र खात राहून, मनाच्या त्या शतधा झालेल्या स्थितींतच त्याच्या देहाच्या चिंधड्या उडाल्या पाहिजेत ! खून काय क्षुल्लक कारणा वरून सुध्धां होतात. तशारीतीनें याचा एकदम खून ह्मणजे कांहींच शिक्षा नव्हे !

मनोरमा—पण अशा स्थितींत आमच्या सन्निध त्याला या कांचनपुरांत येऊन राहवलं तरी कसं ! याचंच मला फार आश्चर्य वाटतं. आणि ह्मणूनच त्याचं आमच्या घराण्याशीं हाडवैर ! मदनाच्या लग्नांत आमचा संबंध ह्मणूनच त्याची झालेली शोचनीय स्थिति ! आणि वसंतावर कुसुमचें प्रेम ह्मणूनच त्या बिचारीला त्या चांडाळाकडून असह्य जाच ! हाय हाय ! काय हें मनुष्याचं मन !

दौलत०—आपणावर चांगली नजर ठेवतां यावी, म्हणूनच जाधवरावानें इथें येऊन ठाणें दिलें, असं मला वाटतं. वसंतराव! तरी आपण म्हणतां तितक्या थरावर एव्हांशींच गोष्ट नेण्यांत कांहीं अर्थ नाहीं. मी त्याचा सर्व बंदोबस्त करतो. वेळोवेळीं लागेल तेव्हां मला तुमचें सहाय्य असलें म्हणजे झालें. जाधवरावाच्या दुष्ट कृत्यांबद्दल त्याला योग्य शिक्षा झालीच पाहिजे आणि ती परस्पर होण्यांतच फार मजा आहे.

वसंत— मग कसं करूं म्हणतां? आपण सांगाल त्याप्रमाणेंच करावंसं वाटतं.

दौलतराव— तें मी सांगेन मग. आतां येतो तर.

वसंत— दौलतराव! आपण कांहीं दिवस तरी इथेंच रहावं असं मला वाटतं.

दौलत— कांहीं दिवस कां! नोकरी सोडल्यामुळें आतां मी नेहमींच इथें राहणार आहे. येतो मी आतां संध्याकाळीं फिरून भेटेन.

( जातो. )

मनोरमा— आतां पुढें काय करावं, असं तुला वाटतं?

वसंत०—करणार दुसरं काय? हे दौलतराव इथें राहून जाधवरावाच्या प्रत्येक बारीकसारीक गोष्टीकडे लक्ष देण्याच्या विचारांत आहेतच. तोंपर्यंत मला वाटतं, आपण जाधवरावाच्या नांवानें एक पत्र पाठविणं कांहीं वाईट नाहीं. त्यांत ह्या सर्व गोष्टींचा उल्लेख जरूर केला पाहिजे. व हें हव्या त्या रीतीनें सिद्ध करून दाखविण्याची आपली पूर्ण तयारी आहे. असें त्याला कळतांच त्याची वृत्ती पालटल्यावांचून कधीं राहणार नाहीं.

( इतक्यांत एक गडी येतो. )

मनोरमा--असंच करणं हें ठीक.

वसंत०—हा जाधवरावाकडला गडी! कायरे, काय खबर आहे?

गडी—धनीसाहेबांची प्रकृती कालपासून एकाएकीं फारच बिघडली आहे. मध्येंच जबरदस्त आंचका बसल्याप्रमाणें होऊन ते अर्धा तास, तासभर सुध्धां बेशुद्ध पडतात. असें काय झालं कांहीं कळत नाहीं. पण अजारीपणाचीं कठीण अशीं हीं लक्षणें पाहून आत्याबाईनें आपणाला लवकर घेऊन ये ह्मणून मला पाठविलें आहे. त्या आपली अगदीं वाट पहात आहेत.

मनोरमा— हें काय आश्चर्य! इतकी प्रकृती एकदम कशानें बिघडली? आणि त्याकरतां इतर वैद्य सोडून वसंत त्यांनीं तुला-आपल्या वैऱ्याला अशा प्रसंगीं बोलावणं ह्मणजे मोठेंच नवल!

वसंत— नवल कसलं! माझ्याविषयीं आत्याबाईंचं मत कांहीं वाईट नाहीं. कुणी दुसरा नसेल लवकर येण्या-सारखा ह्मणून मलाच बोलावलं झालं. तर मला गेलेंच पाहिजे. ( गड्यास ) ठीक आहे, तूं चालूं लाग हा मी आलोंच.

( पडदा पडतो. )

प्रवेश ३ समाप्त.

---

# प्रवेश ४ था.



( नलिनी प्रवेश करते. )

नलिनी—त्या ठिकाणाहून माझी सुटका कशाला झाली ! हजारों सजीव आणि निर्जीव वस्तूंचा स्वाहा करणाऱ्या त्या अथाक जलसमूहांतून मी जिवंत कशाला बाहेर पडलें ! माझ्या प्राक्तनांत लिहिलेल्या अशा कोणत्या मोठ्या सुखाच्या लाभाकरतां, त्या यमराजाला माझी कींव येऊन मला जिवंत ठेवण्याची त्याला इच्छा झाली ! काळाच्या जबड्यांत सांपडलें असतांही तिथून मी जिवंत सुटावें अशाप्रकारचा पुण्यसंचय माझ्या हांतून कोणत्या जन्मीं झाला होता ! छे, कांहीं नाहीं. त्यापेक्षां माझा त्याठिकाणींच अंत झाला असतां, तर काय वाईट होतं. वसंतराज, आपली उदारबुद्धी खरोखर अवर्णनीय, आपलें अंत:करण दयेनें परिपूर्ण भरलें आहे, यांत शंका नाहीं. आपला सुशील स्वभाव तर अनुपमेय होय. पण ती आपली उदारबुद्धी मला— ह्या जन्मजन्मींच्या अघोर पातकी स्त्रियेला प्राणदान देऊन कशाला दाखविलींत! मला पाहतांच आपणाला दयेचा पाझर फुटला, इतकी माझी योग्यता कुठें आहे. माझ्या हांतून आजपर्यंत घडलेल्या अनेक पातकांचें योग्य बक्षीस, माझा तशा क्रूरपणानें अंत व्हावा हेंच होतें. माझें या जगांत जिवंत राहणें व न राहणें दोन्ही सारखीच. माझा तशा रीतीनें अंत होऊन माझ्या सर्व दु:खांचा शेवट तरी झाला असता. ती मी जिवंत राहून जास्त दुणावली मात्र, यांत काय चांगलें झालें. ( थांबून ) पण हें मी काय म्हणतें ! अहाहा ! मी जीवंत न राहतें तर

माझ्या मनांतील एक अत्यंत प्रिय अशी गोष्ट कशी पार पडती? वसंतराज! मला वांचवून खरोखर हे आपण माझ्यावर फारच उपकार केलत. त्यांत मी आपणाला दूषण काय ह्मणून द्यावें! त्या चांडाळ गुलाबाचा तो अधमपणा, त्याचीं तीं भयंकर शहारे आणणारीं कृत्यें, गरीब बिचाऱ्या अनाथ कुसुमच्या चांगलीं नजरेसमोर आणून, त्याला प्राणांतीही न वरण्याचा तिच्या मनाचा पक्का निश्चय करीन तरच राहीन. ह्या जगांत गुलाबबरोबर लग्न आणि मृत्यू ह्या दोन गोष्टींची तुलना करून मृत्यू किती पटीनें सुखकर आहे, याविषयीं तिची खात्री पटवीन. मला प्रिय असलेली गोष्ट—माझें खरें कर्तव्य आतां एवढेच उरलें आहे. तें माझ्या हांतून पार पडल्यावर मग मी सुखानें मरेन. आई जगदंबे! ही माझी शेवटची इच्छा तूं पूर्ण कर, हेंच मी तुला मागणें मागतें. यावेळेला कुसुम एकटीच बसली असेल का! नसली तरी मी तिची भेट घेणारच. माझ्यावर बेतलेल्या प्रसंगाची इत्थंभूत हकीकत तिच्या कानीं पडल्यावर ती यांत मला खात्रीन दूषण देणार नाहीं. चलातर, तो रस्ता लवकर गांठला पाहिजे. (जाते)

(कुसुमचा दिवाणखाना, कुसुम एकटीच बसली आहे.)

कुसुम— काय हें बाबांचें कृत्य! खरोखर त्यांना अलीकडे जसा कांहीं चळ भरल्यासारखा झाला आहे, असें वाटतें. गुलाबबरोबर लग्न करण्याची इच्छा मी आजपर्यंत कधीं स्वप्नांत सुद्धां त्यांना दर्शविली नाहीं, असं असतां त्याचें माझें लवकरच लग्न होणार, त्याप्रसंगीं अमुक अमुक तुह्मी अमकें अमकें काम करा ह्मणून जिकडे तिकडे हुकूम सुद्धां फर्मावायला लागले. खरोखर मला कसा याचा अगदीं वीट आला आहे. शहाणे सवरते घरांत वडील मनुष्य

ह्मणवायला, पण त्यांची कृती ही अशी. आत्याबाईचा सुद्धां कल पूर्वी तसाच होता, पण अलीकडे तिला खरी गोष्ट समजून येऊन मात्र ती मजवर प्रेम करते पण; प्रेम करते, ह्मणजे माझा घात करीत नाहीं एवढेंच, बाकी ती काय असून नसून सारखीच आहे.

( इतक्यांत एक दासी प्रवेश करते. )

दासी०—ताईसाहेब, बाहेर एक स्त्री आपल्या भेटीची फार इच्छा करीत आहे.

कुसुम०—काय ! माझ्या भेटीची इच्छा करते ? कोण आहे ती ?

दासी—तिला पाहतांच ती अगदीं गरीब कुळांतली असावी असा तर्क होतो, पण आपणाला एक फारच महत्त्वाची बातमी सांगायची आहे ह्मणून ती थोडा वेळ तरी भेट झाली पाहिजे असें मोठ्या काकुळतीला येऊन ह्मणाली.

कुसुम—काय असें ती मला सांगणार कोण जाणें, बरं जा तूं तिला इकडे घेऊन ये. ( दासी जाते नलिनी प्रवेश करते. )

नलिनी—( मनाशीं चहूंकडे पाहून ) काय हें ऐश्वर्य ! कधीं स्वप्नांतसुद्धां पाहिले नाहीं तें आज अशा रीतीनें माझ्या दृष्टीस पडलें ह्या जमीनीवर आंथरलेल्या मखमालीच्या गाद्यावरून चालण्याची सुध्धां मला भीति वाटते.

कुसुम— आज थंडी फार पडली आहे, चल आपण विस्तवाजवळ बसूं.

नलिनी— माफ करा. थंडीचा वगैरे मला कांहीं एक त्रास होत नाहीं. आपली भेट एकदांची कशी होईल, याचीच मला काळजी लागलेली होती.

कुसुम— माझ्याशीं काय तुझें काम आहे ? तुझा सुंदर चेहरा असा दुःखी कां बरें दिसतो ? तुझें नांव काय आहे ?

नलिनी— माझें नांव नलिनी. कुसुम ! माझ्या पेक्षां तुह्मी कितीतरी थोर कुलांत जन्मला आहांत, पण तुमचें हें नाजूक शरीर माझ्या सारखेंच हाडामासांचें केलेलें आहे, त्याअर्थी गरीबस्थितींत असणाऱ्या मजप्रमाणेंच तुह्मालाही क्रूरपणानें झालेले हाल खचित सोसवणार नाहींत. दोघीं-च्याही मनावर त्याचा सारखाच परिणाम होईल. ह्मणून पूर्वीच कांहीं गोष्टी बद्दल सूचना करून तुह्माला पूर्णपणें सावध करावें असें मला वाटतें.

कुसुम०— ह्मणजे काय ? मी समजलें नाहीं. कशा-विषयीं तूं मला सावध करणार ? तुला आणि मला ज्याच्या-पासून सारखीच भीति प्राप्त होण्याचा संभव असा कोण आहे ?

नलिनी०— असा मनुष्य गुलाब-तुमचा सावत्र बंधू. कुसुम ! मला हें सांगणें खरोखर योग्य नाहीं. पण काय करूं. माझ्याच्यानें सांगितल्यावांचून राहवत नाहीं. त्याच्यामुळें माझ्या काळजाचे तुकडे झाले आहेत. माझ्या साऱ्या जन्माचा जो विनाकारण सत्यनाश झाला, तसा आणखीं कुणाही निरपराधी स्त्रीचा तरी होऊं नये, ही माझी मना-पासून इच्छा आहे. कुसुम ! गुलाबबरोबर तुह्मी प्राण गेल्यास सुद्धां लग्न लावूं नका, नाहीं तर माझ्यासारखीच, किंबहुना माझ्याहूनही वाईट तुमची स्थिति होईल !

कुसुम— ( एकदम चकित होऊन ) पण गुलाबबरोबर मी लग्न करणार, हें तुला कुणी सांगितलें ?

नलिनी— ह्यासंबंधानें तुमचाच बाप जाधवराव शिंदे

विलास बागेंत एका गृहस्थाजवळ बोलत होता. त्यांत तुमचें नी त्याचें लग्न लवकरच होणार, अमक्या दिवशीं पानसुपारी होणार, अमक्या दिवशीं नाच होणार, तमक्या दिवशीं गाणें होणार, म्हणून खात्रीनिशी सांगत होता.

कुसुम— तें सर्व अगदीं खोटें आहे. माझ्या बाबांना तसें वाटतें खरें, पण गुलाबबरोबर लग्न करण्याचा माझा मुळींच विचार नाहीं.

नलिनी— हें ऐकून मला फार संतोष वाटतो. ईश्वर करो आणि असंच होवो. जाधवरावाचें निश्चयात्मक भाषण ऐकून मला तें खरेंच वाटलें, पण कुसुम ! त्या मांगाबरोबर तुमच्या सारख्या सुशील स्त्रीयेचा संबंध मी कधींही होऊं दिला नसता.

कुसुम—त्यापासून परांग्मुख होण्याकरितां तूं काय केलें असतेंस ?

नलिनी— त्यासंबंधीं मी तुह्माला अशी कांहीं एक गोष्ट सांगणार होतें. कीं ती ऐकून तुह्मी त्याचें नुसतें नांव सुद्धां उच्चारूं नये, मग त्याचें दर्शन व त्याच्याशीं जन्माची गांठ ह्या गोष्टी लांब राहिल्या. पण ज्याअर्थी तुमचें त्याचें लग्न होणार ही गोष्ट सर्वथैव खोटी आहे, त्याअर्थीं मला जास्त कांहींच सांगण्याची जरूर नाहीं. मी येते आतां. माझ्यासारख्या क्षुल्लक स्त्रीयेबरोबर तुह्मी इतक्या मनमोकळेपणानें बोललां, हें पाहून मला खरोखर फारच आनंद झाला आहे,

( उठून जाऊं लागते. )

कुसुम—( तिचा हात धरून ) अग, पण थांब जरा तुझ्या ह्या संदिग्ध भाषणावरून तुझा वृत्तांत ऐकण्याची मला फार इच्छा झाली आहे,

नलिनी— कुसुम ! ती फारच दुःखदायक गोष्ट आहे. तुह्माला सांगण्यांत सुद्धां कांहीं अर्थ नाहीं. कारण त्यापासून तुह्मांला जास्त वाईट मात्र वटिल.

कुसुम—कांहीं नाहीं. त्याच्याशीं माझा लग्न न करण्याचा जो निश्चय झाला आहे; त्याला तुझ्या ह्या गोष्टीचें साह्य मिळून बराच दुजोरा येईल. तूं सांग. मी ती ऐकण्याला फारच उतावीळ झालें आहें.

नलिनी—ठीक आहे. कुसुम ! तो दुःखदायक प्रसंग केवळ तुमच्याकरतां ह्मणून मी फिरून उच्चारतें. सरासरी, वर्ष दीडवर्षा मागची गोष्ट. सहज कांध्या गोळा करण्याकरतां ह्मणून मी आपल्या राहत्या झोंपडीपासून बरीच दूर गेलें. तों गुलाब तिकडून जातांना मला भेटला. मला पाहतांक्षणीच तो थांबून माझ्याशीं हंसत हंसत गोष्टी करण्याला त्यानें सुरुवात केली. खरोखर त्याच्या स्वभावाची त्यावेळेस मला मुळींच कल्पना नसल्यानें त्याच्या त्या मायावी भाषणाला भुलून जाऊन तत्क्षणीं त्याच्या वरून निर्दोष दिसणाऱ्या प्रेमाला मी बळी पडलें. त्याशिवाय मला कांहींच सुचेनासें होऊन आमची दोघांची भेट झाली नाहीं; असा एक दिवससुद्धां गेला नाहीं. कुसम ! त्याची माझ्या संबंधीं खरी कळकळीचीं भाषणें कोणत्याही इतर स्त्रीनें किंवा प्रत्यक्ष तूंच जरी ऐकलीं असतीस तरी मी आपण होऊन केलेल्या ह्या मूर्खपणाबद्दल तूं मला खचित दोष दिला नसतास. पण काय सांगूं, माझ्या दुर्दैवानें त्याच्या दुष्टपणाचा मला मागाहून प्रत्यय येऊन माझ्या पश्चात्तापाला मात्र कारणीभूत झाला. त्याचें रोजचें दर्शन पंधरा दिवसांवर महिन्यांवर जाऊं लागलें, त्याच्या भाषणांत, त्याच्या वर्तणुकींत

बराच निष्काळजीपणा दिसूं लागला; तरी माझा वेडा जीव त्याच्यावरील प्रीतीनें फिरून तरफडत राही. त्या गोष्टीला आठ दहा महिने लोटले, तसेंच मला झालेल्या मुलाकरितां तरी निदान त्याच्या प्रेमाची ओढ फिरून मजकडे राहील या आशेनें माझ्या बराच जिवांत जीव आणला. होतां होतां एक दिवस संध्याकाळच्या वेळेस गुलाब मला अचानक तिकडून जातांना भेटला. बरेंच दिवसांत त्याची भेट न झाल्यामुळें त्याच्या दर्शनानें मला अमळ बरें वाटून लहान मुलाला त्याजकडे घेऊन गेलें. पण तुझा माझा कांहींएक संबंध नाहीं, मी तुला कधीं पाहिलें सुद्धां नाहीं, असें ह्मणून रागानें तो पुढें जाऊं लागला. रात्र झाली असल्यामुळें त्यावेळेस तिथें कोणीही नव्हतें. मी त्याची पुष्कळ काकळूत केली. निदान लहान मुलाची प्रकृति अस्वस्थ असल्यामुळें त्याच्या औषधपाण्याला तरी पैसे मिळावे ह्मणून त्याच्या हातांपायां पडलें, पण त्याला तिळभरही द्रव न येता उलट रागानें बेफाम होऊन माझ्यासकट त्या मुलाला त्यानें जोरानें खालीं ढकललें. कुसुम! काय सांगूं, त्यासरशींच ताडकन त्या मुलाचें डोकें आपटून त्याचा प्राण गेला!

( शोकाकुल होते. )

कुसुम–अगबाई, काय निर्दयपणा हा! खरोखर मांगाचें सुद्धां हृदय इतकें कठोर राहूं शकणार नाहीं. बरं पुढें?

नलिनी– तें पाहतांच त्या त्याच्या निर्दयपणाबद्दल व कपटानें मला सर्वस्वीं फसविल्याबद्दल मला मोठी चीड येऊन क्षणभर माझें देहभान नाहींसें झालें. मी शोकानें निवळ वेडी बनून त्याच्या मागोमाग धांवूं लागलें. दोघेंही धांवत धांवत कांहीं वेळानें शहराबाहेरील नदीच्या मोठ्या पुलावर

गेलों. ती संधी साधून त्या चांडाळानें कदाचित् त्याच्या ह्या नीच कृत्याचा मी जीवंत राहिल्यास परिस्फोट करीन. ह्या भीतीनें मला उचलून खालीं अथाक पाण्यांत फेकून दिलें.

कुसुम– हरहर ! नाहीं माझ्याच्यानें हें ऐकवत नाहीं. नलिनी ! याहून त्याच्या क्रूर स्वभावाचें चित्र रेखाटण्याला दुसरी कोणची गोष्ट पुरेशी होणार ! खरोखर त्याचा दुष्टपणा आजपर्यंत कित्येक वेळ माझ्या नजरेस आला. मी त्याच्याशीं लग्न कधींही करणार नाहीं.

नलिनी—बस्स, एवढयाचकरतां-हेंच तुह्माला कळविण्याकरतां-तुह्मी आपला निश्चय कायम ठेवावा ह्मणून तुह्माला सूचना करण्याकरतां मी तिथून जिवंत सुटलें याबद्दल परमेश्वराचे फार आभार मानते. कुसुम ! या जगांत आतां जिवंत राहण्याचें मला कांहीं प्रयोजन नाहीं. माझ्या इच्छेप्रमाणें तुह्मी आपला निश्चय ढळूं देऊं नका ह्मणजे झालें.

कुसुम—नलिनी ! हे तुझे मजवर फार उपकार आहेत, त्याबद्दल हे घे तुला बक्षिस. तुझ्या दीन स्थितींत हें तुला बरेंच साह्यकारी होईल. ( देते. ) खरोखर मला तुझी कींव येते. ह्या चांडाळाच्या नादीं लागून तुझा जन्म व्यर्थ गेला !

नलिनी—त्याबद्दल मला आतां कांहींच वाटत नाहीं; पण माझ्याप्रमाणेंच तुमचीही स्थिती होऊं नये, ह्मणून मला फार चिंता लागली आहे.

कुसुम—त्याविषयीं तूं निर्धास्त रहा. नलिनी ! पण ही आपली शोचनीय गोष्ट सांगण्याला तूं तिथून जिवंत कशी सुटलीस याचेंच मला आश्चर्य वाटतें.

नलिनी— अहाहा ! जिवंत कशी सुटले ! परमेश्वर त्यांना उदंड आयुष्य देवो ! कुसुम ! कोणत्याशा कामावरून

तेवढ्या रात्रीं शिरक्यांचा वसंत परत येत असतां त्याच्या नजरेस कुणी तरी अनाथ मनुष्य पाण्यांत पडून गटांगळ्या खात आहे, असें दिसलें. त्याक्षणींच काय सांगूं ! चांगलें पोहायला येत असल्यामुळें कपडे काढून त्या तशा काळोखांत तशा भयंकर जलसमुद्रांत, यत्किंचितही मागेंपुढें न पाहतां त्यानें उडी टाकली व मोठ्या हुशारीनें व हिमतीनें मला बाहेर काढलें ! कुसुम ! ती वेळ, तें ठिकाण, आणि तो जिवावरचा प्रसंग, सर्वच गोष्टी प्रतिकूळ असतांना परक्या-करतां वसंतानें केलेलें हें धाडसाचें कृत्य खरोखर प्रशंस-नीय होय असं कोण ह्मणणार नाहीं. अहाहा ! त्याच्या-सारखा, तरुण असून सुशील, सद्गुणी, दयावान व परोपकार-सहिष्णु मनुष्य क्वचितच आढळेल.

कुसुम– ( वसंताच्या सुस्वभावाचें वर्णन ऐकून मनांत फार आनंदित होते. ) खरोखर शिरक्यांचें घराणेंच तसें आहे. तिथल्या एकेक मनुष्याचा स्वभाव ह्मणजे बिन-मोल आहे.

नलिनी–(तिच्या चेहऱ्याकडे पाहून स्वगत) वसंताचें नांव ऐकून इला इतका आनंद कां बरें वाटावा ! काय ! त्याच्या-वर इचें प्रेम तर नसेलना ! अहाहा ! असें जर असेल तर परमेश्वरा ! तुझ्या ठिकाणीं असलेला न्याय, कुसुम आणि वसंत यांचा विवाह प्रसंग घडवून आणून त्याचें अक्षयीचें कल्याण करण्यांतच दाखीव. ( उघड ) कुसुम ! मी जातें आतां. मी आल्यानं तुला त्रास झाला नाहीं. हें पाहून मला आनंद वाटतो. ईश्वर तुझें कल्याण करो !

( नलिनीला पोंचवायला दरवाजापर्यंत जाऊन परत येते. )

कुसुम—ही नलिनीनं सांगितलेली गोष्ट गुलाबविषयींचा

सर्वांच्या मनांतील तिरस्कार शतपटीनें जास्त वाढवील यांत शंका नाहीं. अर्धवट.मनाच्या आत्याबाईची तर ही गोष्ट चांगल्यारीतीनें खात्री करीलच, पण वरवर गोडगोड भाषणें एकून मनुष्याच्या खऱ्या स्वभावाची यत्किंचितही परिक्षा न करूं शकणाऱ्या द्रव्यलोभी बाबांच्या मनालाही गुलाबच्या दुष्ट कृत्यांची ही हकीकत ऐकून खात्रीनें पूर्ण पश्चाताप होऊन त्याविषयीं त्यांचा राग अनावर होईल यांत शंका नाहीं. ही गोष्ट तिनें सांगितल्यावरून माझ्या मनांत एक नवीन आणि अखेरचा उपाय करून पहावा असें आलें आहे. ही गोष्ट तोंडी जाऊन बाबांना सांगण्याचें तर मला मुळींच धैर्य होणार नाहीं, याकरतां पत्रांत ही इत्थंभूत हकीकत, जेणेंकरून त्यांच्या मनोविकारांना जबरदस्त आंचका बसेल अशा तऱ्हेनें लिहून, तें पत्र त्यांना नेऊन द्यावें ह्मणजे झालें. जर त्यांच्या मनांत सुविचारांचा कांहींतरी लेष राहिला असेल, तर ही हकीकत वाचून त्यांचें मन खात्रीनें पालटल्यावांचून राहणार नाहीं. तर असेंच करावें हें ठीक.

( निघून जाते. )

**अंक ३ रा समाप्त.**

# अंक ४ था.

## प्रवेश १ ला.

स्थळ— जाधवरावाचा निजाण्याचा दिवाणखाना.

( मध्यरात्रीच्या सुमारास झोंपेंतून जाधवराव शिंदे दचकून जागा होतो. )

जाधवराव— मी काय करूं आणि काय न करूं, कांहींच सुचत नाहीं. मला पूर्ण पश्चात्ताप झाला आहे, पण अजून अब्रू जाईल याचीच भीति वाटते. मी इथें येऊन स्थाईक झाल्यावर आज ह्या दहा बारा वर्षांत कोणत्याच गोष्टीपासून माझ्या मनाला एवढा धक्का बसला नाहीं. तो त्या दिवशीं त्या दौलतरावच्या येण्यानें बसून माझें मन फारच अस्वस्थ झालें. ह्या शिरक्यांच्या मनोरमेची आठवण ह्मणजे माझ्या दुष्ट कृत्याचीच मला आठवण होत असे. पण त्याबद्दल मी मुळींच पर्वा केली नाहीं. मी केलेलें कृत्य कधीं बाहेर पडेल याबद्दल माझें मन निःशंक होतें, ती भीति आजपर्यंत माझ्या स्वप्नांत सुद्धां मला शिवली नाहीं. पण त्या दौलतरावच्या येण्यानें ती गोष्ट खरी ठरणार असें मला वाटतें. तो मनुष्य ह्मणजे फारच ठाम निश्चयाचा आहे. एकदां कोणतीही गोष्ट मनावर घेतल्यास तिचा शेंवट लागेपर्यंत ती तो सोडायचा नाहीं, ह्या त्याच्या स्वभावाची मला पूर्वीपासून खात्री आहे. त्या शिरक्यांची व त्याची गांठ पडली कीं ह्या सर्व गोष्टींचा खुलासा झालाच पाहिजे; आणि तसं झालं ह्मणजे माझ्या आजपर्यंतच्या उपभोगलेल्या सर्व संपत्तीवरच केवळ पाणी सोडून स्वस्थ न राहतां कायद्याप्रमाणें भयंकर गुन्ह्याला पात्र होऊन जन्मभर

तुरुंगांत दिवस काढण्याचा प्रसंग येईल ! याला काय उपाय करूं. ( थांबून ) छे, पण कांहीं असो, मी मिळविलेली, मी उपभोगलेली ही सर्व मालमत्ता मुकाट्यानें त्यांच्या स्वाधीन मी कधींही करणार नाहीं. माझ्या नांवाबद्दल अजून मला अभिमान वाटतो. मरणापेक्षां सुद्धां मला माझ्या अब्रूची चाड विशेष आहे. पण नाहीं. असें करणेंही ठीक नाहीं. गुप्त कृत्यांचा परिस्फोट होऊन गांवांत माझी जिकडे तिकडे छिथू: होईल ह्या भीतीनें मी आत्मघात करून घ्यावा यासारखें भित्रेपणाचें काम दुसरें कोणतेंच नाहीं. आणि तें आतांच माझ्या हांतून कसें होणार ही गोष्ट आजपर्यंत कोणालाही माहीत नाहीं. प्रत्यक्ष ज्यांच्या पासून मला भीती त्यांना तर ती कधींच माहीती होण्याचा संभव नाहीं. हा सर्व घोंटाळा करणारा तो दौलतरावच एक काय तो दिसतो. बस ! त्या चांडाळाला या जगांतून नाहींसा केला कीं आटपलें आपलें काम. तो रहातो कुठें याचा उद्यां तपास काढला पाहिजे. त्याचा मागमूस नाहींसा झाला ह्मणजे मला मग कुणाचीच भीति नाहीं. असो. पण याचा विचार उद्यां करूं. अलीकडे स्वस्थ झोंप मला मुळींच माहीत नाहीं. काय असें होत असेल तें असो !

( जाधवराव फिरून पांघरूण घेऊन निजतो. मध्यें कांहीं वेळ निघून गेल्यावर मृत झालेल्या यशवंतराव शिरक्याचें पिशाच्च प्रवेश करतें. हळू हळूं जाधवरावच्या पलं- गाजवळ जाऊन क्षणभर त्याकडे पहात राहते. नंतर अंमळ दूर सरून स्वतःशीं )

पिशाच---ओहोहो ! जिकडे तिकडे झालेली ही सामसूम, हे ठिकाण, ही वेळ, आणि हा मी ! हे निशादेवी तूं माझी पूर्ण साह्यकर्ती आहेस ! तुझ्या सान्निध्याला बहुतेक नेहमीं असणाऱ्या काळ्याकुट्ट आंधारांत मला कसें स्वच्छ दिसतें. ह्या ठिकाणीं मी आणि हा—दोन निरनिराळ्या प्रकारचीं माणसें आहोंत. अरे पण हा कोण— हा तोच आणि मीही तोच. हा माझ्या पक्का आठवणींतला आहे. हा माझा पूर्वींचा जिवाचा दोस्त ! माझी याची अतिशय मैत्री ! मागें एका वेळेस आह्मी दोघेंही एकमेकांकरतां अगदीं तरफडत होतो. पण आतां नाहीं. आतां हा माझा वैरी—पक्का हाड-वैरी बनला आहे ! याचा सूड—मी सूड घेईन ! ( रागानें जाधवरावच्या पलंगाजवळ जातो. )

( जाधवराव झोपेंत दचकून बरळतो )

जाधवराव—हा माझाच मूर्खपणा. मी सर्वस्वी अपराधी आहें आणि लोकांना दूषण देतों. माझें अंतःकरण खुनी आहे, तरी मी दुसऱ्याचा खून करायला भितों. ( पिशाच त्याच्याकडे निरखून पाहतें—मोठ्यानें ) नको नको ! पैशा-करतां कशाला मला मारतां ! मी आतां अगदीं थोड्या दिवसांचा सोबती आहे. तोंपर्यंत मी तुह्माला द्रव्याची वाटेल ती मदत करतो, पण मला तुरुंगांत नेऊं—नका—

पिशाच—नका. नुसतां तुरुंगांत नेण्यांत काय अर्थ, हा सुळावर चढावा असें वाटतें. नरदेहांतून मुक्त होऊन याची स्थिती माझ्याप्रमाणेंच झाली पाहिजे !

जाधव—मी आजपर्यंत श्रीमंत, अब्रुदार, ह्मणून नावा-जलेलों आहे. माझी लोकांत चांगली पत आहे, असें असतां मी हें निंद्यकर्म कसें करीन.

**पिशाच**—आणखीं निंद्यकर्म कोणचें करण्याचें राहिलें आहे. श्रीमंत, अनुदार, अहाहा! खरोखर हातून घडलेलीं हजारों नीच कारस्थानें वरपंकीं छपवून ठेवण्याला ही श्रीमंती फार उपयोगी आहे यांत शंका नाहीं.

**जाधव०**— तीं रत्नें खरोखर मीं बळकावलीं नाहींत. अहो सोडा हो. नका असे मला छळूं ओय ओय ( कण्हत चावळतो. )

**पिशाच**— अरे हा जागा झाला वाटतं. तर क्षणभर आपण इथून नाहींसें होऊं ( एकदम गुप्त होत. )

**जाधव०**— ( मोठ्यानें किंकाळून उठून बसतो ) हा कोण त्रास तरी! माझे प्राण कासावीस होतात. इतक्यांत मला एक स्वप्न पडलें. त्यांत रत्नासंबंधीं हकीगत कुणी-तरी मला मोठ्या जोरानं दरडावून विचारीत आहे, असा भास झाला. मीं तीं रत्नें पाहिलीं नाहींत, मला त्याबद्दल मुळींच माहिती नाहीं, असें त्याला पुष्कळ सांगितलें, पण त्याचा त्याजवर कांहींच परिणाम न होतां तो माझ्या छाती-वर बसून माझें नरडें दाबून माझा प्राण घेऊं लागला. इतक्यांत मी दचकून जागा झालों. ( चहूंकडे पाहून भीतीनें ) अरे बापरे! काय ही भयाण रात्र! सगळा दिवस कसा तरी अनेक उद्योग धंदे करण्यांत जातो, पण रात्र आली कीं ती काळाचीच रात्र भासते! त्या दिवशीं त्या दौलतरावनें सांगितल्याप्रमाणें विश्वास-घात करणाऱ्या मला— हायहाय! माझ्यासारखा नीच विश्वासघातकी दुसरा कुणीही या जगांत नसेल! अरे चांडाळा जाधवरावा, नानाप्रकारचीं वचनें देऊन त्यांतलें एक सुद्धां खरें करूं नये, इतकी कशी

पालटली अथवा, ज्याचा पैसा सफाई बळकाऊन तो जन्मभर उपभोगीत आहेस, त्याचीच मान कापतांना तुला शंका कशी वाटली नाहीं ! आपल्या ह्या कृतीनें नीचपणाचा कळस, तूं लोकांना कसा करून दाखविलास ! हे पशो ! तुला पापपुण्याची भीति कांहींच कशी वाटली नाहीं ! हरहर ! मला त्या मृत झालेल्या यशवंतरावचें पिशाच्च नेहमीं— ( इतक्यांत दचकून मोठ्यानें ओरडतो— अंमळ स्थीर होऊन थरथर कांपत ) कोणसें आल्याचा मला इतक्यांत फिरून भास झाला. मोठ्यानीं पावलें सुद्धां वाजलीं. हें काय असेल ! अशाप्रकारचा भास मला या पूर्वी दोनचार वेळ झाला होता, पण आजचा प्रकार कांहीं विलक्षण दिसतो.

( यशवंतरावचें पिशाच्च येते. )

**पिशाच्च**—थांब. थांब. असा घाबरूं नकोस. क्षणभर नीट अवसान धर, व मी विचारतों त्या प्रश्नाचें उत्तर दे. ( जाधवराव जागच्याजागीं खिळल्यासारखा होतो. ) जाधवराव ! मी कोण आहे हें तूं ओळखलंस ?

**जाधवराव**—( अंमळ धैर्य धरून ) होय, आपला चेहरा ओळखीचा दिसतो. तुह्मी यशवंतराव शिरके आहांत असें वाटतें—

**पिशाच्च**—( मध्येंच एकदम ) वाटतं नाहीं, तोच मी यशवंतराव, आणि तोच तूं विश्वासघातकी जाधवराव. माझी अशी स्थिती होण्याला कारण, नीचा सर्वस्वी तूं आहेस ! तूं माझा जिवाचा दोस्त ह्मणवून माझा घात केलास ! माझ्याशीं बेइमानी केलीस ! माझ्या अनाथ बायकापोरांना सफाई बुडविलंस !

जाधवराव—होय, माझ्याहातून अशी कृती झाली खरी. माफ करा. मला त्याचा आतां पूर्ण पश्चाताप होतो.

पिशाच—( रागानें ) जळून खाक होवो तुझा पश्चात्ताप. अगोदर नीच कृतीचें बिनदिक्कत आचरण करणें, व मागाहून, ' पश्चात्ताप झाला– माफ करा ' ह्मणणें, असले मानभावी प्रकार मला मुळींच खपायचे नाहींत. माझी झालेली भयंकर नुकसानी भरून काढण्याला मी काय करूं ? तुझ्या नुसत्या ' माफकरा ' ह्मणण्यानें ती कशी भरून निघणार ? माझ्या मनाचें शांतवन अशारीतीनें कसें होईल ?

जाधव— यशवंतराव ! माफ करा– माझ्या हातून भयंकर अपराध घडला खरा. होऊं नये, पण गोष्ट झाली. त्याबद्दल मला आतां किती तरी वाईट वाटतें ह्मणून सांगू ! माझ्या जिवाची खरोखर सारखी ओढाताण चालली आहे. घटकेची सुध्धां मला स्वस्थता नाहीं. याकरतां झाली शिक्षा ही पुष्कळ असें समजून आतां नका माझा अंत पाहूं !

पिशाच— तुझा अंत पाहणेंच मला इष्ट आहे, आणि तोही साध्यारीतीनें नाहीं. कुजत राहून आलेल्या तुझ्या मृत्यूनें, इतर दुसऱ्या हलकट द्रव्यलोभी मनुष्यांच्या मनांवर चांगलाच परिणाम झाला पाहिजे. दुसऱ्याचा पैसा ह्मणजे आपला, असें समजणाऱ्या लोकांच्या अंतःकरणांत ह्या तुझ्या स्थितीची आठवण, ह्मणजे जबरदस्त साडेसातीप्रमाणें अहोरात्र खात असली पाहिजे. तुझ्या माझ्या पूर्वीच्या एकमेकांवरील प्रेमाची आठवण झाली ह्मणजे या जगांत विश्वास असा कोणावर ठेवावा, हें अनुमान काढणें खरोखर कठीणच.

जाधवराव—तुमच्यावर माझें प्रेम नव्हतें असें नाहीं,

पण हा घातकी द्रव्यलोभ माझ्या पूर्णपणें नाशाला कारणी-भूत झाला. तुमच्या अमोल रत्नांनीं माझ्या जन्माचा सत्यनाश केला त्याला मी काय करूं !

पिशाच—यांत कसला तुझा नाश ! तुझा अंत केव्हां ना केव्हां तरी होणारच आहे. आणि आपल्याला शिक्षा झाली, यांत कांहींच विपरीत नाहीं. पण अनाथ सर्वस्वी माझ्यावर अवलंबून राहणाऱ्या, मी केव्हां परत येईन ह्मणून माझ्या वाटेकडे अहोरात्र सारखे डोळे लावून राहणाऱ्या माझ्या कुटुंबाची—चाडाळा—तुझ्या हातून जी धुळधाण उडाली यापेक्षां दुसरें अधमपणाचें कृत्य कोणचें असूं शकणार ! बस नाहीं, तूं माझा घात केलास ! मरणानंतर सुधां मला तुझ्याच मुळें अशी स्थिति प्राप्त झाली. तुझ्या आत्तां नरडीचा घोट घ्यावासा वाटतो— ( रागानें जाधवरावाच्या अंगावर चालून जातें. जाधव० बेशुद्ध होऊन पडतो. पिशाच नाहींसें होतें. )

जाधव०— ( थोड्या वेळानें शुद्धीवर आल्यावर चहूंकडे पाहून दुःखानें स्वगत ) हाय हाय ! यापेक्षां त्या जहाजावरच माझा अंत कां झाला नाहीं ! माझी व या यशवंतरावची गांठ पडून दोघाचें एकमेकांवर प्रेम—एकमेकावर विश्वास कशाला जडला ! या कालकूट विषाची परिक्षा पाहण्याकरता जिवंत न राहतां, त्यावेळेसच माझ्या आयुष्याचा शेवट कां नाहीं झाला ! दिलेल्या सदसद्विवेकशक्तीचा काडी इतकाही उपयोग न करतां, अशारीतीनें जन्म घेतल्याचें चीज न करणाऱ्या मला—ह्या जाधवरावला—क्षुद्राचरण करणाऱ्या या मनुष्याला, परमेश्वरा, सर्वांत श्रेष्ठ असा हा नरदेह काय समजून दिलास ! मला पशूची सुद्धा उपमा योग्य

नाहीं. चांगलें कोणचें व वाईट कोणचें, सुखदुःखाची खरी कल्पना, निदान अमक एक वस्तु आपल्या नाशाला कारणीभूत आहे हें पशूंनां चांगलं समजतं, आणि तेंच मला ह्या सर्व बुद्धिज्ञानाच्या जोरावर सुद्धां समजूं नये, याहून माझी योग्यता त्यांच्यापेक्षां किती तरी कमी ! अशा स्थितींत आपल्या बरोबर दुसऱ्याच्याही दुःखाला कारणीभूत होण्याकरतां मी कशाला जन्माला आलों ! जन्मतांच मला कुणी ठार कां केलें नाहीं ! सर्व जगाच्या उपहासाला पात्र होणाऱ्या ह्या जाधवरात शिंद्याला लहानपणीं एवढ्या काळजीपूर्वक कशाला वाढविला ! ( कांहींवेळ स्तब्ध राहतो. ) यशवंतराव ! तुमच्या ह्या अशा स्थितींत अकस्मात येण्यानें, मला असह्य जाच होत आहे. माझ्यावरील तुमची ही कडी नजर जेणेंकरून कमी होऊन दोघांनाही सौख्य होईल, असं मी काय करूं ? आज्ञाबद्ध राहिल्यानें प्राप्त झालेल्या ह्या स्थितींतून सुटका होण्याकरतां तुमची कोणची इच्छा मी पुरवूं ! सांगा, त्यावेळीं अविचारानें माझें डोकें धुंद असल्यामुळें, ह्मटल्याप्रमाणें माझ्या हातून कृती कांहींच घडली नाहीं, पण आतां—

पिशाच—( प्र०करून ) पण आतां तरी काय खाली मानायची ! आणि माझी कसली इच्छा आतां तूं पुरविणार ! तूं आपलं सर्वस्व जरी आज विकून मला दिलंस, तरी माझ्या काळजाला पडलेले घांव कसे नाहींसे होणार ! कांहीं नाहीं माझ्या झालेल्या स्थितीला योग्य असाच मोबदला मला मिळाला पाहिजे आणि तो तुझा हालहाल होऊन झालेला मृत्यु हाच होय. ह्या संपत्तीची आतां मला मुळींच इच्छा नाहीं.

जाधव०—( भीतीनें घाबरून जाऊन ) यशवंतराव ! नका, नका असं करूं. ह्यांतून मी वाचेन असं मला मुळींच वाटत नाहीं, पण माझे हाल होऊन माझा अंत नका होऊं देऊं. तुमच्यापासून घेतलेली सर्व संपत्ती मी तुमच्या कुटुंबाला देऊन टाकतो, पण माझी अब्रु गेलेली माझ्याच्यानें क्षणभरही पाहवणार नाहीं !

पिशाच—काय ! ह्या वरपंकी अब्रूची अजून तुला चाड आहे ? एकूण इभ्रत वाढविणारा एकही गूण अंगांत नसतां लोकांत अब्रूदार ह्मणवून त्यांना फसविण्याची तुझी इच्छा अजून जागृत आहे ह्मणायची !

जाधव०— लोकांना फसविण्याचा यांत माझा मुळींच उद्देश नाहीं, पण मी जिवंत आहे तोंपर्यंत तरी माझा आजपर्यंत चालत आलेला लौकिक कायम राहिला ह्मणजे बस्स झालं. यशवंतराव ! माझी ही विनंती मान्य केल्यास, मला फार सौख्य होईल.

पिशाच— असें झालें तर तुझ्या घोर अपराधाबद्दल तुला कांहींच शिक्षा झाली नाहीं असं होईल. असलं नीच कर्म केल्यास परिणाम काय होतो याचा लोकांना कांहींच उमज पडणार नाहीं. तुझी भयंकर कृत्यें आंतल्या आंत दबून राहतील, आणि तसं झाल्यास माझ्या मनाप्रमाणें काय—कांहींच होणार नाहीं. तें कांहीं नाहीं. इतर साधारण लोकांत आणि तुझ्यांत जो विलक्षण फरक आहे, तूं ज्या मार्गाचें अवलंबन करून मोठ्या मिजाशीनें आपला काळ घालवीत आहेस, तो मार्ग सत्याला किती सोडून आहे, हें जगाला चांगल्या रीतीनें समजण्याकरितां तुझ्या बेअब्रूचा डंका चहूंकडे गाजला जाऊन मरणाअगोदर तुझी गांवांतून

धिंड निघाली पाहिजे. दुःखाचा व कष्टाचा असलेला सर्व वांटा झाडून तुझ्या नशीबाला आलाच पाहिजे. माझ्याशीं बेइमानी केल्याबद्दल माझ्या जिवाला काय वाटत आहे— माझ्या वेदना मला कशा रीतीनें छळीत आहेत, निर्धनतेंत दिवस काढण्यांत किती हाल सोसावे लागतात, याची कल्पना तुला न झाली; तर मी तुझा सूड घेतला असं कसं होईल ! त्याशिवाय माझ्या आत्म्याला खरी मुक्ती कशी मिळेल !

जाधव०— माझ्या सांगण्याप्रमाणें आपणांकडून कोणत्याच रीतीची संमती दिसून येत नाहीं, माझा एकही शब्द आपणाला पटत नाहीं, तर काय तुह्मी मला छळून छळून मारणार ? अरे देवा !

पिशाच—हो, तुला छळून मारणार ह्मणूनच आज मी तुला सोडीत आहें, कृतकर्माची यथायोग्य तुला खात्री पटावी ह्मणूनच तुला अजून कांहीं दिवस मी जिवंत ठेवीत आहे, नाहींतर आत्ताच तुझ्या नरडीचा घोंट घेतला असता !

जाधव०— ( घाबरून मागें सरतो ) मग हाल होऊन मरण येण्यापेक्षां तसं झालेलं कांहीं वाईट नाहीं. यशवंतराव ! मी तुमच्या पायां पडतो, मी तुमचा सर्वस्वी अपराधी आहे, मला शिक्षा करण्याचा तुह्माला पूर्ण अधिकार आहे, पण यशवंतराव ! आपल्या मागच्या प्रेमाची आठवण धरून माझी शेवटची एक विनंती मान्य करा. माझा तुह्मी सूड घेणार तो आतां या घटकेला इथल्या इथें घ्या, ह्मणजे ह्या सर्वच त्रासांतून मी एकदांचा सुटेन ! मला आतां मृत्यूची मुळींच भीति वाटत नाहीं, पण कुजत राहून माझा अंत होणार, ही नुसती कल्पनाही असह्य होते !

पि०—( रागानें ) बस्स, नाहीं. ही गोष्ट कधींही

व्हायचा नाहीं. तुला तुझ्या दुष्कृत्यांची आठवण करून देऊन पूर्णपणें सावध राहण्याविषयीं सूचना करायला मी इथें आलों होतों. हा मी आतां चाललोंच. आपल्या कर्मांची फळें भोगीत असतांना, तुझ्या सारखी अघोरकृती ह्या जगांत आणखी तरी कोणाच्याही हातून न होऊं देण्याविषयीं परमेश्वराची सतत प्रार्थना करीत रहा– ( पिशाच्च जातें )

जाधव०— ( हे विचार असह्य झाल्यामुळें मूर्छित होऊन पडतो. अशा स्थितींत उरलेली थोडी रात्र संपून दिवस निघाल्यावर सावध होऊन चहूंकडे पाहतो ) नाहीं, गेलाच तो, अगदीं दिसेनासा झाला आणि हा दिवसही उगवला हें ठीक झालें. बा सूर्यनारायणा ! माझ्या आयुष्याचा शेवट होऊन माझे प्राण ह्या देहांतून निघून जातत्तोंपर्यंत तूं असाच प्रकाशित रहा ! ती भयंकर रात्र फिरून माझ्या नजरेस कधींही न पडो ! माझें काळीज दुभंग झालें, माझें धैर्य अजिबात गळालें, माझ्या अंगांत सणसणून ताप भरला, आणि त्यायोगें मला वाटतें माझा लवकरच अंतही होईल. तर तसें होण्यापूर्वी माझ्या मनांत आलेली गोष्ट मला करून टाकलीच पाहिजे. ( थांबून दुःखानें ) हाय ! हाय ! माझ्या लाडक्या मदनाला मी विनाकारण घरांतून घालवून दिला. केवढा माझा तो अविचार ! आतां कसचा तो फिरून माझ्या दृष्टीस पडतो ! ( थांबतो ) पण तो नसला तरी कुसुम माझ्या विश्वासाची आहे, तिच्यावरच मी ही आपली शेवटची कामगिरी सोंपवून ह्या काळजींतून निर्मुक्त होईन. ( चिंतित बसतो. इतक्यांत एक गडी येतो. )

गडी—( स्वगत ) आज धनीसाहेबांची प्रकृती जास्त बिघडली कीं काय कोण जाणे, पुष्कळ वैद्य आले, पुष्कळ औषधेंही झालीं, पण अजून ह्मणावा तसा कांहीं गूण येत नाहीं. धनीसाहेबांच्या जिवाला चैन पडत नसलं ह्मणजे आह्मा चाकर माणसांनाही कसंसंच होतं. असो. आपण आपली सांगितलेली कामगिरी बजावावी.

( पुढें होऊन पत्र देतो. )

जाधव०—( पत्र घेऊन ) कुणी दिलंरे हें पत्र ?

गडी—कुसुम ताई साहेबांनीं आपल्याला देण्याकरतां सांगितलं आहे.

जाधव०—( आश्चर्यानें ) काय ? कुसुमनीं दिलंन पत्र हें ? आणि तें तुझ्याकडून ? आणि ती स्वतः काय करते आहे ?

गडी—दिवाणखान्यांत आत्याबाईबरोबर गोष्टी करीत बसल्या आहेत.

जाधव०—बरं आहे, तूं जा, आणि हांक मारीन तेव्हां ये. इथें जवळपासच ऐस. ( गडी जातो. पत्र फोडून त्यांतला नलिनीसंबंधाचा सर्व मजकूर वाचून मध्येंच त्रासल्यासारखी तर मध्येंच रागीट मुद्रा करतो ) हा पुन्हां दुष्कृत्याचा कळस ! आणि त्याला कारणीभूत झालेला माझाच मुलगा गुलाब. अरेरे ! किती निर्दय अंतःकरण हें ! खरोखर आजपर्यंत प्रत्येक गोष्टींत केवळ अविचारामुळें माझ्या हातून केवढाले अन्याय घडत गेले ! निरपराधी, अनाथ अशा एका कुटुंबाची जन्माची मीठभाकर त्यांच्यापासून मी बळजबरीनें हिसकावून घेतली ! केवळ जन्मांतरीच्याच दुर्दैवामुळें माझ्यासारख्या नीच मनुष्याच्या पदरीं पडलेल्या

साध्वी स्त्रीयेचा हवातसा छळ करून, अकालींच तिचा झालेला शोचनीय मृत्यू मी निर्दयानें सुखकर मानला! जन्मापासून दुष्टकर्माचा तिरस्कार करणाऱ्या माझ्या सुविचारी, सुशील मदनाचें आचरण, माझ्या इच्छेविरुद्ध म्हणून त्याला देशोधडीला लावून, ह्या कर्मचांडाळाला— प्रत्यक्ष कालसर्पाला मी मोठ्या लडीवाळपणानें घरांत बाळगला! अरे अरे! आतां पश्चात्ताप होऊन रडत बसण्यांत काय अर्थ! माझा मदन मला सोडून गेला! तो नाहींच फिरून मला भेटणार! ( पुन्हां पत्राकडे पाहून रागानें ) हें अधमपणाचें कृत्य माझ्याच मुलाच्या हातून— गुलाबच्या हातून घडलें ना! अरेरे! त्याचें भाषण गोड पण कपटी असेल, वरून दिण्यांत संभावीतपणाची परिपूर्ण ऐट पण आंतून तो इतका उफराटया काळजाचा असेल अशी नुसती शंका सुद्धां मला आजपर्यंत आली नाहीं. ( पुन्हां वांचून ) तें कोमल अर्भक ज्याच्याकडे पाहून प्रत्यक्ष कृतांताच्या सुद्धां हृदयाला पाझर सुटला असतां, त्याचा ह्या नराधमानें क्षणार्धात चुराडा उडविला, याहून तिरस्करणीय असें त्याच्या हांतून दुसरें कोणचें वर्तन घडणार! बस्स तशा प्रकारचें मृत्यूपत्र केल्याबद्दल माझ्या मनाला पश्चात्ताप झालाच आहे, त्याला ह्या गोष्टीचें साह्य बरेंच मिळालें. अशा स्थितींत त्याच्यावर कुसुमचें मुळींच प्रेम राहूं नये, यांत काय आश्चर्य! ( पहारेकऱ्यास ) कोंण आहे रे तिकडे?

गडी—( प्रवेश करून ) जी धनीसाहेब, काय आज्ञा आहे?

जाधव०—जा. गुलाबला मी आतां याक्षणीं बोलावलें

आहे ह्मणून सांग. ( गडी जातो. ) माझ्या पापाचें ईश्वरानें असा कुजात पुत्र देऊन चांगलेंच प्रायश्चित्त दिलें ह्मणायचें, चिंता नाहीं. झालेल्या चुकीची दुरस्ती करण्याला अजूनही अवकाश आहे. तें मृत्यूपत्र मला बदललेंच पाहिजे.

( इतक्यांत भीतभीत गुलाब प्रवेश करतो. )

जाधव०—( रागानें गुलाबापुढें पत्र फेंकून ) गुलाब ! तूं माझाच मुलगा ना ? मदनचा सख्खा भाऊ ?

गुलाब—( आश्चर्यानें स्वगत ) ह्मणजे हा काय चमत्कार !

जाधव०— तें पत्र वाच. ( गुलाब पत्रांतला मजकूर वांचून काळा ठिक्कर पडतो ) गुलाब ! कुसुमची, तशीच तिच्या संपत्तीची, सर्वांचीच इतःपर तूं आशा सोड; इतकेंच नाहीं तर अशा रीतीनें आजपर्यंत तूं मला सुध्धां फसविलेंस, त्याबद्दलचें प्रायश्चित ह्मणून तुझा मी आपल्या संपत्तीवरचा हक्क आजिबात काढून टाकला आहे. तूं केवळ मानवरूपधारी चांडाळच ह्या पृथ्वीवर माझ्या पोटीं कुळाला कलंक लावायला निपजलास, यांत शंका नाहीं. जा, चालता हो इथून. आजपासून तुझें हें काळें तोंड माझ्या दृष्टी समोर सुध्धां नको.

( गुलाब ! कांहीं एक न बोलतां निघून जातो. )

पडदा पडतो.

**प्रवेश १ ला समाप्त.**

———

# प्रवेश २ रा.

स्थळ— जाधवरावाचा वाडा.

( वसंत एकटाच प्र० करतो. )

वसंत— आज तर जाधवरावानें चांगलाच बिछाना धरला. मधूनमधून घेरी यायची ती येतेच. तापही अंगांत अगदीं सणसणून भरला आहे, तेव्हां प्रकरण अंमळ असाध्यच दिसतं. हा अंगविकृतीचा रोग आहे, याजवर औषध द्यायचें ह्मणून द्यायचें एवढेंच. बाकी तो रोग नाहींसा होण्याला मुख्य मनाची स्वस्थता पाहिजे; ती याची अगदींच नाहींशीं झाल्यासारखी दिसते. ही नुकतीच येऊन गेलेली घेरी ह्मणजे खरोखर शेवटचीच असं वाटत होतं, पण दिलेल्या औषधानें तूर्त अंमळ बरं वाटून सध्यांच्या घटकेला रोग्याच्या जिविताशेचीं चिन्हें दिसूं लागलीं. अत्याबाई जवळ बसल्याच आहेत काळजी घ्यायला, तोंपर्यंत आपण कुसुमची भेट घेऊन तिला ही बातमी सांगावी. इथें येण्याची व मनसोक्त वावरण्याची जी पूर्वी मला भीति वाटत होती, ती तर आतां अगदीं नाहींशी झाली. ( कांहीं पावलें चालून ) हा कुसुमचाच दिवाणखाना; आणि कुसुमही एकटीच बसली आहे.

( पडदा उघडतो. कुसुम दिवाणखान्यांत बसली आहे. वसंत येतो. )

कुसुम—( त्याला पाहतांच उठून ) कसं काय वसंतराज? आतां बाबांची प्रकृति कशी काय आहे ?

वसंत—आहे अंमळ बरी आहे; पण हा रोग मात्र फारच भयंकर, यांत शंका नाहीं. ही अशी घेरी यायला यांना कारण तरी काय झालं ?

कुसुम—तें कांहीं मला माहीत नाहीं, पण अलीकडे नुकतेंच एकदोन दिवसांपूर्वी आह्मी सर्वजण बसलों असतांना 'विलासबागेजवळ तुह्माला एक चमत्कारिक मनुष्य भेटून, त्यानें तुह्माला एकदम तुमचें नांव विचारलें, व तुमच्या आज बरीच वर्षें नाहींशा झालेल्या बाबांविषयीं मला कांहीं माहिती आहे,' असें ह्मणून तो तुमच्याबरोबर तुमच्या घरीं गेला, अशी बातमी गुलाबनें येऊन सांगितली. बाबा ऐकतच होते. त्याचें सांगणें होत नाहीं ताच आह्मी पहायला लागलों तों बाबा मोठ्यानें किंकाळी फोडून धाडकन बसले असतांनांच मागें जमीनीवर पडले ते मुळी बेशुद्ध. सतेज दिसणारा त्यांचा चेहराही काळा ठिक्कर पडला, इतका एकदम त्यांच्या प्रकृतीवर त्यायोगानें परिणाम झाला. त पाहतांच आमचा तर सर्वांचा जीव कसा अगदीं उडून गेला. झालं त्या वेळेपासून ही राहूनराहून घेरी यायला सुरुवात झाली.

वसंत—( स्वगत ) हं समजलों. याचें कारण तो दौलतरावच. परमेश्वरा! ज्याचा परिणाम शेवटीं अशा प्रकारचा भयंकर व्हायचा ही गोष्ट अगदीं ठरलेली आहे, असे दुष्ट विचार माझ्या मनांत तूं कधींही येऊं देऊं नकोस !

कुसुम— वसंतराज ! बाबांचीं स्थिति कठीणच दिसते. कांहीं जीवाला अपाय होण्याची तर भीति नाहीं ना ?

वसंत— तें कांहीं सांगतां येत नाहीं, पण नसो ह्मणजे झाल, आणि होतां होइतों त्यांना चांगल्या स्थितींत आणण्याचा यत्न केलाच पाहिजे. तुह्मी आपल्याकडून कमी काळजी घेत आहां असं नाहीं, याउपर ईश्वर आहेच. पण आपण नेहमीं चांगल्याच गोष्टीची इच्छा करून आनंदांत असावं. वाईट होतां होइलतों मनांत आणूं नये.

कुसुम— मदन लवकरच परत येणार ह्मणून मागें त्याच्या एका पत्रांत लिहून आलं होतं. पण तो केव्हां येणार आहे काय जाणे. मला वाटतं वसंतराज आपण पत्रांत बाबांची अशी ही स्थिती लिहून त्याला इकडे ताबडतोब निघून येण्याविषयीं लिहावं, हें बरं.

वसंत— माझ्याही मनांत तेंच आलं आहे. तूं लिहीत असलीस तर ठीकच झालं, नाहीं तर मी आज त्याला पत्र लिहिणार आहें.

कुसुम—मग मी लिहिलं काय आणि आपण लिहिलं काय एकच. तुह्मीच त्याला लवकर येण्याविषयीं लिहा, ह्मणजे झालें.

वसंत— ठीक आहे. कुसुम ! मी येतों तर आतां. जेव-णाची वेळ होऊन घरांतील सर्व मंडळी माझीच वाट पहात असतील.

कुसुम—हरकत नाहीं. पण परत येणंही लवकरच होईलना ? बाबा नेहमीं आजारीपणांत आपली आठवण काढ-तात, तेव्हां लवकरच यायचं. शिवाय आपण इथें असलां ह्मणजे किनई तितका तो माझा वेळ कसा आनंदांत जातो ह्मणून सांगूं !

वसंत— मी लागलाच परत येईन. तूं खात्री ठेव ( तिचा हात धरून ) तुझ्याशीं निःशंकपणें भाषण करण्याची मला आतां मुळींच भीति वाटत नाहीं, याला कारण ह्मणून तसाच कांहीं एक चमत्कारिक प्रकार घडून आला. ही गोष्ट जाधव-रावांना सांगण्याचा माझा विचार होता, पण ते इतक्यांत आजारी पडले.

कुसुम– ( आश्चर्यानें ) ह्मणजे, तुमच्या बाबाविषयींची कां बातमी ! काय अशी ती ?

वसंत—हो, पण ती मला आतांच सांगतां येत नाहीं; तरी तुला कळविल्यावांचून मी रहायचा नाहीं. बरं तर मी येतों आतां.

कुसुम—ठीक आहे. ( वसंत निघून जातो. )

कुसुम—( आपल्याशी ) काय तरी हा चमत्कारिक योगायोग ! याला सुदैव समजूं कीं दुर्दैव समजूं ! कांहींच ठरवितां येत नाहीं. वसंतरावना पूर्वी इथें येण्याची केवढी मनाई, पण बाबांच्या आजारीपणाचें त्याला कारण होऊन त्यांचें येणेंजाणें इथें अलीकडे नेहमीं व्हायला लागलं. नुसत्या दर्शनाकरतां तरी हापापलेल्या ह्या माझ्या तृषित नेत्रांना तें सौख्य दुर्मिळ होऊन जे केवळ त्यांच्या चिंतनांतच दिवस घालवावे लागत, त्यांच्याच जवळ बसून चारचार घटकां सुद्धां भाषण करण्याची आतां मला मोकळीक मिळाली. नशीबाच्या जोरावर सौख्य प्राप्तीच्या मार्गाआड येणारा जबरदस्त कांटा आपोआप नाहींसा झाला. पण बाबांची स्थिति दिवसेंदिवस चमत्कारिक होत चाल-ल्यामुळें हें सर्व मनासारखें असूनही कांहीं सुचेनासें होतें. आई जगदंबे ! ह्या दुखण्यांतून बाबांना लवकर बरें कर. कृतकर्माचा पश्चात्ताप झाला, याहून त्यांना दुसरी कडक शिक्षा आतां नको.

( इतक्यांत गुलाब प्रवेश करतो. )

गुलाब—( स्वगत ) बाबांचें मन कुणीतरी वळविलें आहे खास, त्याशिवाय असें व्हायचें नाहीं. त्यांचा ठाम निश्चय ढांसळण्याला कांहीं तरी तसच कारण झालें असलें पाहिजे. ती हडळ नलिनी. तिथून जिवंत कशी सुटली याचेंच नवल वाटतें. त्यामुळें तर माझें फारच नुकसान

झालें आहे. तिच्या संबंधाची हकीकत—जी मी चोरून ठेव-ण्याचा इतका यत्न केला— ती उघडकीस आल्यापासून तर मला काय करावें आणि काय नाहीं कांहींच कळत नाहीं. ह्या दुखण्यांत बाबांचा बहुतेक अंत होईल असें वाटतें. तर तसें होण्याच्या अगोदर माझ्या नांवानें करून दिलेलें मृत्युपत्र त्यांच्याकडून बदललं गेलं नाहीं, ह्मणजे मिळविली, मग कांहीं कां होईना. बाबांचे ते शब्द ऐकून मात्र माझ्या मनाला जी अस्वस्थता उत्पन्न झाली आहे, ती खास आतां नाहींशी होणार नाहीं. ( पुढें येऊन कुसुमला उद्देशून ) कुसुम ! मला तुला कांहीं प्रश्न विचारायचा आहे.

कुसुम— ( तिरस्कारानें ) काय प्रश्न विचारायचा आहे ? तुझ्या मनाप्रमाणें जर माझ्याकडून तुला कधींही उत्तर मिळणारें नाहीं, तर उगाच मला प्रश्न विचारण्यात तरी काय अर्थ ?

गुलाब—मझ्याकडून काय अपराध झाला असेल तो त्या ईश्वराला माहीत, पण कुणी तरी निव्वळ हरामखोरपणा करून, भलत्या सलत्या गोष्टी बाबांच्या मनांत भरवून माझ्याविषयीं अगदीं निर्मल असलेलें त्याचें अंतःकरण कलुषित केलें. त्यामुळें माझा संपत्तीवरचा हक्क काढून तिचा वारस मदन परत आल्यास तो, नाहीं तर तूं व्हावीस असा त्यांनीं आपल्या मनाचा पक्का निश्चय केला आहे, पण मी तुला विचारतों, खरेंच सांग, मदन परत न येतां जर वाटेंतच मेला तर ह्या मालमत्तेवर तूं आपला हक्क चालविशील का ?

कुसुम—किती भयंकर ही कल्पना ! हे शब्द तुझ्या-ज्यानें उच्चारवले तरी कसे ? व असें करण्याला मी ह्मणतें तुला काय अधिकार आहे ? कोण्या वेळेला काय होईल

याचा जरी कांहींच नियम नाहीं, तरी अशी भलतीच कल्पना मनांत आणून एव्हांशीं त्याबद्दल मी आपलें कांहींच मत देऊं शकत नाहीं.

गुलाब—त्याबद्दलचा आधार मजजवळ आहे. कालरात्रीं वाटेंत मोठें वादळ उत्पन्न होऊन बरीचशी प्राणहानी झाली. त्याच जहाजांत येत असलेला मदनसुद्धां बहुतेक तेव्हांच मरायचा, पण त्याला फार मोठी अशी जखम होऊन अगदीं आसन्न मरण झाल्याची मला नुकतीच बातमी लागली आहे. त्याचा बहुतेक कांचनपूरच्या किनाऱ्यावर पाय ठेवण्याच्या अगोदरच अंत होईल. ह्मणून ह्मणतों.

कुसुम—(रागानें) अरे अर, चांडाळा जरीं तुह्मीं कुयें अमानुष, तलेच तुझे विचार! ते कुठून चांगले असणार! चल चालता हो. ह्या बाबतींत फिरून एक अक्षरही मजसमोर उच्चारूं नकोस! पक्का हरामखोर मनुष्य.

गुलाब—तूं सुद्धां वाटेल तशी बोलायला लागलीस. कुसुम! अजून ह्मणतेस मी हरामखोर झालों नाहीं, पण यापढें प्रसंगानुसार मला तसें झालेंच पाहिजे. तूं सांगणार नाहींस हें मला माहीत आहे व तूं तरी काय सांगणार. मदनच्या मृत्युनंतर अनायासें येत असलेल्या संपत्तीला तुझ्याऱ्यानें नको कसें ह्मणवेल; पण मी हेंही तुला सांगून ठेवतों कीं मृत्युपत्रांत जर अशा प्रकारचा कांहीं घोटाळा झालेला माझ्या दृष्टीस पडला, तर आपल्या हक्काच्या एकेक पैकरतां मी शेवटपर्यंत भांडल्याशिवाय कधींही राहणार नाहीं. माझ्या आड येणारा मनुष्य, मग तो कोणीही असो, मी त्याचा केवळ काळ आहे असें समज.

(उत्तराची वाट न पाहतां निघून जातो.)

कुसुम—( शहारून ) आई जगदंबे ! काय करशील तें खरें ! कसली ही बातमी ह्या मेल्यानें सांगितलीन ! ती ऐकतांच माझें काळीज चर्र झालें. ( थांबून ) छे. पण असें नाहीं व्हायचें. मी निघालों आणि लवकरच परत येणार ह्मणून मदनचें नुकतेंच पत्र आलें. कोणत्यातरी कारणाव- रून अतीशय चवताळल्यामुळें त्याच्या तोंडून असे शब्द निघाले एवढेंच, त्याबद्दल खेद मानून घेण्यांत काय अर्थ आहे. ( निघून जाते. )

---

## प्रवेश ३ रा.

स्थळ—जाधवरावचा दिवाणखाना.

( जाधवराव एका कागदाची घडी करून तें मोहोरबंद करतो. )

जाधव० —( स्वतःशीं रागानें ) हरामखोर ! दुष्टपणाची केवळ कमाल करून सोडली ! त्या अधमाला अशीच शिक्षा झाली पाहिजे. ( गड्यास ) कोण आहे ?

पहारेकरी—( प्रवेश करून ) जी सरकार.

जाधव०—जा. कुसुमला मी आतां बोलावलें आहे ह्मणून सांग. ( पहारेकरी जातो ) ती मात्र पूर्वीपासूनच अगदीं निष्कपट मुलगी आहे, आणि ती तशी आहे ह्मणूनच माझ्या मनाला ह्या वेळेस अंमळ तरी समाधान वाटलें. तिच्यावर माझा पूर्ण विश्वास आहे, तेव्हां एकदां मला वचन देऊन ती अन्यथा आचरण कधींही करणार नाहीं. ( कुसुम येते, तिला उद्देशून ) आलीस, ये बैस.

कुसुम—( आश्चर्यानें स्वगत ) आलीस आणि ये बैस ! असें समाधानाचे शब्द बाबांच्या तोंडून आज बरेंच वर्षांत निघाले. बहुधा त्यां माझ्या पत्राचा कांहींतरी परिणाम झाला असला पाहिजे. ( जवळ जाऊन उघड ) बाबा, आज तुह्माला अंमळ बरें वाटतेसें दिसतें !

माधव०—हो, माझ्या मताप्रमाणें कांहीं गोष्टी घडणार ह्मणून आज मला बरें वाटतें. कुसुम ! तो दरवाजा अगोदर गच्च लावून टाक. ( कुसुम तसें करून येते )

कुसुम—बाबा ! तुह्माला आज बरें वाटतें; तें पाहून मला फार आनंद होतो. माझ्याशीं काय काम आहे आपल्याला ? मी काय करावेंसें तुह्माला वाटतें ?

माधव०—कुसुम ! आजपर्यंत मी तुला नाहीं नाहीं तें बोललों. त्या दुष्ट गुलाबाच्या नादीं लागून तुझ्या बऱ्याची अशी मी आजपर्यंत एकही गोष्ट केली नाहीं. सुशील मदनाला मी विनाकारण घरांतून घालवून दिला. लोक चांगलें ह्मणतील, अशा प्रकारची माझ्या हातून एकही कृती झाली नाहीं. कुसुम ! अशा स्थितींत माझें ह्मणणें तूं कसें ऐकावेंस ! ( खिन्न होतो. )

कुसुम—हें काय बाबा ? असें वाईट काय ह्मणून वाटून घेतां ? जी गोष्ट होऊन गेली ती कांहीं आतां परत येत नाहीं; पण तेवढ्यावरून तुमच्याविषयीं माझें मन वाईट आहे, ही कल्पना सुद्धां तुह्मी मनांत आणूं नका. तुमच्याविषयीं माझी पूर्वीपासूनची पूज्यबुद्धी जशीची तशीच कायम आहे. माझ्या बऱ्याविषयीं जर तुह्माला काळजी आहे तर तुह्मी सांगण्याचाच अवकाश, तुमच्या करतां मी काय वाटेल तें करीन.

जाधव०—तुला ज्याबद्दल अतीशय तिटकारा आहे, अशी कोणचीच गोष्ट मी तुला सांगणार नाहीं. तर जेणें-करून तुला सौख्य होईल अशी दुसरीच एक कामगिरी विश्वासानें मी तुला करण्याला सांगतों. ( मोहोरबंद केलेला कागद खिशांतून काढून क्षणभर त्याजकडे पाहतो ) कुसुम! हा घे. माझा मदन मजजवळ नाहीं ह्मणून हा मी तुझ्याज-वळ देत आहे.

कुसुम—( त्यावर मदनचें नांव पाहून आश्चर्यानें ) बाबा! मदनच्या नांवाचा हा कागद आहे, आणि मोहोरबंद केलेला--

जाधव०—हो, त्यालाच हा द्यायचा. कुसुम! एखाद्या सुरक्षित ठिकाणीं कुणाला न कळत तुझ्याच्यानें जितक्या बंदोबस्तानें ठेववेल तितक्या बंदोबस्तानें हा ठेव. आणि मी मेल्यानंतर—( कुसुम चकित होऊन त्याच्या तोंडाकडे पाहते )—हो कारण मी आतां फार दिवस वांचेनसें मला वाटत नाहीं. मदन परत आला ह्मणजे हा तूं त्याच्या जशाचा तसाच स्वाधीन कर. पण ध्यानांत ठेव, कोणत्याही कारणास्तव गुलाबला याची नुसती वार्ताही नसली पाहिजे आणि जर वाटेंत कांहीं अपघातांमुळें किंवा इतर कोण्याही रीतीनें मदन इथें परत येत तोंपर्यंत जिवंत राहिला नाहीं, तर मग तूं हा उघडून त्यांत लिहिल्याप्रमाणें वाग, ह्मणजे माझ्या अगदीं मनाप्रमाणें झालें असें मी समजेन. काळजी ठेव. ही माझी शेवटची इच्छा तूं अतृप्त राहूं देऊं नकोस.

कुसुम—पण बाबा! मदन लवकरच परत येणार आहे. तर तो आला ह्मणजे आपणच हा त्याजजवळ द्यावा.

जाधव०—छे! छे! त्याला परत आलेला पाहण्याकरतां मी खास जिवंत राहणार नाहीं. त्याची माझी फिरून या

जगांत तरी भेट होईल असं मला वाटत नाहीं. कुसुम! मी ह्मणतों असें नच झालें तर तुला सांगितलेली ही कामगिरी माझी मीच बजावीन. तोंपर्यंत हा आपल्याजवळच असूं दे. हा फारच महत्वाचा आहे, याकरतां याला काळजीपूर्वक जप, आणि ही गोष्ट तोंपर्यंत कुणालाही—प्रत्यक्ष तुझा तो प्रियकर—शिरक्यांचा वसंत—त्यालाही तूं कळविणार नाहींस असें मला वचन दे.

कुसुम—( फिरून विस्मित होऊन त्याजकडे पाहते ) बाबा—

जाधव०—खरोखर तुला चकित होण्याचें कांहीं कारण नाहीं. माझ्या ह्या दुखण्यांत त्यानें मला मनापासून साह्य केलें आहे. कुसुम ! मी आतां पूर्वीचा जाधवराव राहिलों नाहीं. वसंतासारखा चांगला मनुष्य क्वचितच आढळेल अशी आतां माझी खात्री झाली.

कुसुम–( कृतज्ञतापूर्वक ) बाबा ! आपणाला बरं वाटून आपण अंमळ हिंडूफिरूं लागला ह्मणजे आपणाजवळ एक गोष्ट काढण्याचा माझा विचार होता. आणि माझं तें ह्मणणं तुह्मी अमान्य करणार नाहीं असं मला वाटतं. तसंच मदनचा व मालतीचा विवाह व्हावा ह्याही गोष्टीला तुमच्याकडून आतां कांहींच हरकत नसावी ! बाबा ! होय ना ?

जाधवराव— मी एव्हांशींच कांहीं सांगूं शकत नाहीं. माझ्या हातांपायांत शक्ती येऊन माझं मन जर अंमळ स्वस्थ झालं, तर पुष्कळच माझ्या मनांतून करायचं आहे; पण तसं होण्याला अंमळ अवकाशच लागेल. कुसुम ! हें तुला माहीतच आहे कीं पूर्ण विचारांतीं दिवसगतीनें कोणतेंही काम झालें तर त्याचा परिणाम नेहमीं चांगलाच होणार.

कुसुम— अहाहा ! बाबा ! दुसऱ्याच्या सांगण्यावरून आजपर्यंत तुमच्या हातून पुष्कळशा चुक्या झाल्या खऱ्या, पण तुमचें अंतःकरण फारच मायाळू आहे, यांत शंका नाहीं. बाबा ! ही तुमची कृती खरोखर सर्वमान्य होईल.

जाधव०— तुला त्याचें कारण माहीत नाहीं. माझें बहुतेक आयुष्य लुच्चेगिऱ्या करण्यांतच गेलें. मी अगदीं लहान असतांनाच माझा बाप वारला, तेव्हां मात्र मी प्रामाणिक व सुशील वर्तनाचा होतो, पण कोणा दाबता न राहिल्यामुळें तो माझा स्वभाव पुढें पालटला. माझ्या आईचा सारा जन्म कष्ट करण्यांतच गेला, पण तिच्या सारखी गरीब व मायाळू स्त्री क्वचितच आढळेल. मी अजारी असतांना मला तिची वारंवार आठवण होत असे, आणि ती माझ्या उशाशीं बसून जणूं काय माझ्याशीं भाषणच करित आहे व मी पुढें काय काय करावें हें मला सांगतच आहे असा भास होई !

कुसुम—तर बाबा! तिच्याकरतां तरी तुह्मी मदनाचे अप-राध क्षमा करून त्याला फिरून आपल्या संपत्तीचा वारस कराल ना ? बाबा ! तो मनुष्य फारच छान आहे व मला तर तो प्राणापलीकडेही चाहतो.

जाधव०—हो जरूर. त्याला घालवून दिल्यापासून माझ्या मनाला खरोखर कधींही स्वस्थता मिळाली नाहीं. असो. झाल्या गोष्टीला इलाज नाहीं. पण कुसुम ! माझ्या हातून आजपर्यंत तुझ्या संबंधानें तसेंच मदनाच्याही संबंधानें घडलेल्या सर्व गोष्टी तुह्मी दोघेही पार विसरून जाऊन, आतां त्याविषयीं कांहीं एक मनांत ठेवणार नाहीं, असें मी इच्छितों.

**कुसुम**—बाबा ! कांहीं केलंत तरी आह्माला लहानपणापासून पाळून, ममतेनें शिक्षण देऊन जे ह्या योग्यतेला चढविलंत, त्यापुढें हें कांहींच नाहीं. उलट अजाणपणामुळें रागाच्या सपाट्यांत मदनकडून तसेच माझ्याकडून जे कांहीं अपराध झाले असतील त्यांची तुह्मीच आह्माला क्षमा करा, ह्मणून मीं विनंति करते.

**जाधव०**—छे. छे. क्षमा ! तुमचा यत्किंचितही अपराध नसतां मी क्षमा कशाची करूं ! कुसुम ! त्या गोष्टी आतां काढण्यांत कांहीं अर्थ नाहीं. आतां तें जाऊं दे. आजचं तुझं माझं झालेलं संभाषण कुणाजवळही न सांगतां, मी दिलेला तो कागद काळजीपूर्वक जपून ठेवून मदनाला दे ह्मणजे झालें.

**कुसुम**—त्याबद्दल तुह्माला मुळींच काळजी नको. तुह्मी सांगितल्याप्रमाणें करण्याला मी कधींहीं चुकायची नाहीं.

**जाधव०**—ठीक आहे. जा तर आतां ( सुस्कारा टाकून ) ह्या एवढेशा बोलण्यानेंच मला किती तरी हा शीण आला.

**कुसुम०**—( उठून ) आपण अंमळ स्वस्थ मनानें थोडी विश्रांती घ्या ह्मणजे बरें वाटेल. मी येतें आतां.

( कुसुम निघून जाते. )

**जाधव०**— ( स्वतःशीं ) काल माझी प्रकृती चांगली आहे असें मला वाटून हा रोग लवकरच शमून मी थोडक्याच दिवसांत चांगला हिंडूं फिरूं लागेन ह्मणून मला बरेंच समाधान वाटत होतें, पण रात्रीं चांगली झोंप न लागल्यामुळें कीं काय जाणें कशामुळें तें, पण आज मी उठल्यापासून मला कसेंसेंच होत आहे. पुनः अंगांत ताप

मरल्यासारखा वाटतो. दिवसही अगदीं उदास दिसूं लागला आहे. एकंदरींत कालच्या आणि आजच्या प्रकृतींत पुन्हां फरक पडला यांत शंका नाहीं. याला काय करावें. कुसुमला ती कामगिरी सांगून त्यांतून तर एकदांचा निर्मुक्त झालों, तरी पण— ( गडी येतो. ) कायरे ?

गडी— ( पत्र देऊन ) हें एक पत्र आपल्या नांवानीं नुकतेंच आलें आहे.

जाधव०— ( घेऊन ) बरं आहे जा तूं. ( गडी जातो. ) ह्या पत्रांनीं तर माझी कशी सारखी पाठ पुरविली आहे आणि प्रत्येकांत आनंदाच्या वर्तमानाचा लेशही नसावयाचा. निजून उठलों कीं पत्र, जेवलों कीं पत्र, बाहेरून आलों तरी पत्र, एक घेऊन चार घटकाही लोटत नाहींत तों दुसरें तयार आहेच. असो. यांत आणखीं काय आहे कुणाला ठाऊक. लोकांना तरी मी अजारी असतांनाच पत्र लिहायला वेळ मिळतो. ( पत्र उलट सुलट करून पाहतो ) अं. हें कांचनपुरांतूनच कुणी पाठविलेलें दिसतें. आणि तेंही नेहमींपेक्षां तिप्पट मोठें, असा हा कोण गृहस्थ असावा ! ( पत्र फोडतो. वाचूं लागतो. )

" जाधवराव यांस— सरासरीं पंधरावर्षांमागें तुह्मी ज्या जहाजावरील कप्तान "—

अं. हें काय ! ( पत्राच्या शेंवटची सही पाहून ) समजलों, झालं, माझें काळीज ह्या अर्ध्या ओळीनेंच दुभंग झालें. माझे हातपाय थरथर कांपूं लागले. हें त्या शिरक्यांच्या मनोरमेनें लिहिलेलें सविस्तर मजकुराचें पत्र—आंत काय असेल, ह्याविषयीं शंकाच नको. आणि तेंही अशा वेळींच यावें ना ! पण उपाय काय वांचून पाहिल्यावांचून आतां राहवतच नाहीं. ( वाचतो )

' त्या तुमच्याच जहाजावर तुमच्या हाताखालील असलेल्या दौलतरावशीं गांठ पडून त्यांच्या तोंडून मला जो समजायला पाहिजे होता तो सर्व मजकूर समजला. त्यांच्या सांगण्यांत मरणसमयीं जहाजावर त्यांनीं तुमच्याजवळ विश्वासानें बरीचशीं अमोल रत्नें, जीं मिळवायला त्यांनीं हा एवढा त्रास सोसला होता— तीं तुह्मी इथें आल्याबरोबर आमच्या स्वाधीन करावींत ह्मणून तुमच्याजवळून शपथ घेववून, मग प्राण सोडला, असें झालें. '

अरे अरे ! हा दौलतराव तर केवळ माझा मृत्युच. आपली नेहमींचीं रीत सोडून माझा प्राण हरण करण्यापूर्वी कांहीं दिवस मला सूचना देऊन माझ्या मनाची काय स्थिती होते, याची केवळ मौज पहाण्याकरतांच ह्या कांचनपुरांत येऊन राहिलासा वाटतो. त्याचें स्मरण होतांच माझ्या नाडीचे ठोके सुद्धां बंद होऊं पाहतात !

( वाचतो. )

" शिवाय ह्या गोष्टीबद्दल दौलतरावजवळ वाटेल तसा पुरावा या क्षणाला हजर आहे. तुह्मी इथें कांचनपुरांत येण्याऐवजीं परस्पर सुवर्णनगराला जाऊन सरासरी पंचवीस लक्ष रुपये किंमतींचीं रत्नें विकल्याबद्दलचाही पुरावा ते आहे ह्मणून खात्रीनें सांगतात तेव्हां यावरून हा खटला न्यायाधिशापुढें आल्यास त्याची वाटेल तशी खात्री सहज करून देतां येईल याविषयीं आतां शंकाच राहिली नाहीं, व तसें झालें ह्मणजे तुमची काय गती होईल याचा तुह्मीच विचार करा, पण ही गोष्ट इतक्या थरावर आणणं निदान मला तरी बरं वाटत नाहीं. कारण तुमच्या मदनावर माझें फार प्रेम आहे. शिवाय तुमची स्त्री व मी पूर्वी मैत्रिणी

होतों, ह्यामुळें व आणखीं अशाच कांहीं कारणास्तव हा तंटा आपसांतच मिटवावा असं मला वाटतं. "

.याला मी तयार आहे, पण माझ्या मनाप्रमाणें यांतली अट नसेलच; तेव्हां हा तंटा कसा मिटेल याची शंकाच आहे.

( वाचतो. )

' जाधवराव, त्या रत्नाबद्दलची तुह्मांला मिळालेली किंमत व त्याचें आज इतक्या वर्षांचें व्याज हें सर्व मिळून पाहतां तुमची लहान मोठी सर्व मालमत्ता व तुमचा वाडाबिडा सर्वच आज तुमच्या हातून जाण्याला पहात आहे. कारण, तुह्मी न बळकावतां ती रक्कम जर आमची आमच्या स्वाधीन केली असतीत तर तुह्मी हल्लीं ज्या स्थितींत अहांत त्याच संपन्न स्थितींत आह्मी सुद्धां राहतो. '

तर काय हें सर्व जप्त करून आज चार चौघांत मला उकिरडयावर बसविणार कीं काय ! ( निश्चयानें ) नाहीं, हें मात्र कधींही व्हायचें नाहीं. माझाही बोज त्यांत राखून काम होत असेल तर त्याला मात्र मी तयार आहें.

( वाचतो. )

" असो. झाल्या गोष्टी त्या झाल्या. त्यांत नवलाची गोष्ट ह्मणजे एवढीच कीं आमचाच पैसा खात राहून आमच्याशींच तुह्मी इतकीं वर्षें शत्रुत्वानें वागलांत, एवढेच नव्हे तर नुसती आपली ओळख सुद्धां दिली नाहीं. दुर्दैवाच्या फेऱ्यांत आह्माला कायमचें गोंवून आपण निशंकपणें मन मानेल तशी चैन करीत राहिलांत. पण ह्या साऱ्या गो[illegible] मी आतां मनांत आणीत नाहीं. कारण तुह्मी आतां तरी न्यायानें वागून आपल्या नांवाला कलंक लावून घेणार नाहीं, अशी मला आशा आहे. ही गोष्ट यापूर्वीच आपणाला कळवून

मी सावध करणार होतें, पण आपण आजारी असल्यामुळें आपल्याला त्रास देणं मला बरं वाटत नाहीं. तरी आतां याचा काय तो निकाल होईल तितक्या त्वरेनें लावावा. आपल्या चरितार्थाकरितां नगदींपैकीं कांहीं भाग मीच तुह्माला आपण होऊन देतें, पण ह्या दोन्ही मालमत्ता माझ्या माझ्या स्वाधीन उद्यां झाल्याच पाहिजेत. आमचा विश्वासघात केल्याबद्दलची याहून तुह्माला ज्यास्त शिक्षा नको असेल तर याचा मी लिहिल्याप्रमाणें बंदोबस्त करण्याला चुकूं नये; नाहींतर परत्रा हा खटला जवळ असलेल्या सर्व पुराव्यानिशीं कोर्टांत नेण्याची जरुरी पडेल. पण तशी वेळ न यावी असेच मीही इच्छितें; आणि दौलतरावचें ही मत तसेंच आहे. आपण लिहाल तर मीच तिकडे उद्यां येईन, नाहींतर वसंत आपणाकडे येतोच आहे, त्याच्याबरोबर काय तें मला कळवावें. जास्त कांहीं लिहीत नाहीं. '

ही ह्मणतें हें सर्वस्वीं खरें आहे, आणि तसें केल्याशिवाय ही कधींही चुकायची नाहीं. त्या दौलतरावचें तिला पूर्ण पाठबळ, मग काय जाधवराव, भरलींच तुझीं शंभर वर्षे. ( मन ह्या विचारांतीं जास्त क्षुब्ध होऊन ) अरे अरे ! ही तर अगदीं अखेरचीच वेळ आली आहे. आतां केलेल्या महाभयंकर पातकांचा झाडा देण्याला तूं कसा तयार राहशील! जाधवराव, केलेलें कर्म अक्षयीं गुप्त राहील असें त्या तुला कसं वाटलं ! पुढचा मागचा कांहीं एक विचार न पाहतां, ईश्वराचीही यत्किंचित भीति मनांत न बाळगतां, गुन्हा उघडकीस आल्यास लागूं पडणाऱ्या सरकारी कायद्याच्या असह्य त्रासाचीही पर्वा न करितां ही अत्यंत अघोर खाटकाची कृती करण्याला तूं चांडाळा त्या वेळेला कसा

प्रवृत्त झालास ! धडधडीत हजारों जणांना त्यांच्या अप-राधाबद्दल होत असलेल्या भयंकर शिक्षा प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं दररोज पाहून त्याची भीति तुला कशी वाटली नाहीं. आज जी सर्वांची गती तीच आपली ही कल्पना सुद्धां तुझ्या मनांत कशी आली नाहीं. असलं नीच कर्म करून भोगायला मिळणारें सौख्य अगदीं क्षणिक—अक्षयीचें कधींही होऊं शकणार नाहीं हा सुविचाराचा लेश सुद्धां तुझ्या त्या वेळीं धनमदानें धुंद झालेल्या डोक्यांत कसा शिल्लक उरला नाहीं. तूं निव्वळ पशू-पशू कसा बनलास! ( कांहीं वेळ थांबून ) आतां भोग हीं त्याचीं फळें ! आतां कचरून—आतां वाईट वाटून घेण्यात काय अर्थ ! झालेली चूक नुसत्या कोरड्या पश्चात्तापानें कधींहीं भरून येणारें नाहीं. ( पुन्हां त्या पत्राकडे नजर फेंकतो ) यशवंतराव ! तुमचे शेवटचे शब्द मी विसरलों नाहीं. त्याप्रमाणें माझ्या हातून आजपर्यंत कृती झाली नाहीं व आतांही होण्यासारखी नाहीं; पण तुम्ही म्हटल्याप्रमाणें माझ्या सारखी पैशाच्या लालचीनें कोणाच्याही हातून अघोर कृती होऊं नये ! माझा झालेला परिणाम पाहून त्यांनीं आपल्या धुंदीमध्यें सुविचाराला पार झुगारून देऊन शेवटीं अक्षय नरकाचें साधन करून न घेतां वेळींच सावध राहावें, सद्धर्मानें व न्यायानें वर्तन ठेवून असलेल्या स्थितींतच आनंद मानून, सर्व बऱ्या वाईट कृती घडवून आणणाऱ्या, संपूर्ण जगाचीं सूत्रें आपल्या हातीं ठेवून अनियंत्रितपणें तें चाल-विणाऱ्या त्या एका सर्वशक्तिमानपरमेश्वराची भीति नेहमीं मनांत बाळगूनच काळ कंठावा, ह्या क्षणभंगुर आयुष्यांतील क्षणिक टिकणाऱ्या सुखाच्या लालचीनें हातून अन्यथा

आचरण कधींही होऊं देऊं नये, एवढें मात्र आतां मी मनापासून इच्छितों. ( क्षणभर थांबून ) काय चमत्कार पहा ! ईश्वरानें दिलेल्या नुसत्या मीठभाकरींतच समाधान मानून, आपल्या आप्तइष्टाला, आपल्या घरांदारांना, आपल्या सर्वस्वाला सोडून परदेशीं जाऊन प्राण संकटांत घालण्याचें धाडस करण्याला यशवंतरावला कारण काय तर ही दौलत ! अहोरात्र जलपर्यटन करून आपला जीव धोक्यांत घालण्यासारखें जहाजावरील कप्तानाचें काम करण्याला मला कारण हीच दौलतीची चाड. प्राणोत्क्रमणाच्या वेळचें त्या यशवंतरावचें तें हृदय विदारून टाकणारें भाषण ऐकून मन कळवळल्यामुळें त्याजजवळ वाहिलेली ती शपथ व ती योग्य तऱ्हेनें पाळण्याविषयींचें त्या वेळच्या मनाच्या स्थितींत मोठ्या जोमानें दिलेलें अभिवचन, कांहीं काल लोटला नाहीं तोंच अगदीं कस्पटाप्रमाणें लेखून इहपरलोकीं अक्षय दुःखाचेंच साधन करून देणारें अति निंद्य कर्म करण्याला माझ्या दुर्बल मनाची प्रवृत्ति व्हायला मुख्य कारण हीच दौलतीची अनावर तृष्णा ! पुढेंही आयुष्यक्रमांत घडलेले हजारों अन्याय ह्याच दौलतीच्या पायीं. माझ्या मदनानें मला सोडून गेल्याचें कारण दौलतच. कदाचित उघडकीस येईल कीं काय ह्मणून रात्रंदिवस मनाला टोंचीत असलेली, एक क्षणभर सुद्धां जिवाला स्वस्थता न मिळूं देण्याला कारणीभूत झालेली ह्या दौलतीचीच भीति. आणि शेवटींही कृतकर्माचें प्रायश्चित्त ह्मणून माझ्या गळ्याला फांस लावून नरकाची वाट दाखवायला कारणीभूत झालेलाही दौलतरावच. आतां मी काय करूं ! छे. करणार काय ! ( पुन्हां पत्र वाचून ) तिनें ह्या पत्रांत लिहिल्या-

प्रमाणें दोन्हीही मालमत्ता तिच्या स्वाधीन केल्या तर माझ्या-पाशीं काय कांहींच राहिलं नाहीं. आजपर्यंत अंबारींत बसण्याच्या योग्यतेचा गणलेला मी सर्वस्व घालवून उद्यांच उकिरड्यावर कसा बसूं! छे. छेः ही कल्पना माझ्या मनाला मरणप्राय दुःख देते. तसली स्थिति पाहणें मला क्षणभरही सहन होणार नाहीं. (थांबून) काय हे विचार! माझें डोकें भ्रमूं लागलें, माझी शक्ती नाहींशी होत चालली. माझ्या रक्ताचें ह्यानें केवळ पाणी पाणी होऊन गेलें आहे. मनातील उद्वेग प्रत्येक विचारागणीक वाढत जाऊन माझी शुद्धि नाहींशीं होईल कीं काय, याची भीति वाटते. मनोरमे, खास तूं ह्या पत्रांतही भलतीच अट लिहिलीस, ती मला कधींही मान्य होणार नाहीं. हें तुझें पत्र निवळ माझा प्राण घेण्याकरितांच तूं पाठविलेंस, यांत शंका नाहीं. आणि तसं तरी कां न व्हावं. माझं जीवितच मला कंटाळवाणं झालं आहे. तें हा एवढा जबरदस्त धक्का बसतांच नाहींसें होईल यांत काय नवल! नाहीं नाहीं, असा अपमान झालेला मला कधींच पाहवणार नाहीं. मला मुळींच सहन होणार नाहीं. मनोरमे, तुला यापुढें सौख्यानें नांदण्याकरितां पैसा ह्मणतीस तर हवा तितका दिला असतां, पण—पण—( अतीशय क्षुब्ध चित्त होऊन घाबरून पडतो )— ही सगळी मालमत्ता— सगळी —माझें सर्वस्व—नाहीं नाहीं,— तें तर मी कधींच— नाहीं—कधींच देणार नाहीं— नाहीं—

( त्या झटक्यासरशीं प्राणोत्क्रमण होऊन जाधवराव एका हाताच्या मुठींत तें पत्र गच्च आंवळून धरलेला असा धाडकन कोचावर पडतो. )

( अंक ४ था समाप्त. )

# अंक ५ वा

## प्रवेश १ ला.

स्थळ—कांचनपुरांतील एक रस्ता.

( मदन एकटाच प्रवेश करतो. )

मदन—( खिन्नस्वरानें ) त्या प्रसंगांतून नशीबानें व जोरावरच मोठ्या मारामारीनें निभाऊन जेमतेम किनाऱ्यावर पाय ठेवतों मात्र, तोंच दुर्दैवानें ही अमंगळ वार्ता कानावर आली ! एका तुफानांतून सुटलों तों दुसऱ्या तितक्याच पटीनें कठीण अशा तुफानांत सांपडलों. बाबा एकाएकीं वारल्यामुळें मला तर कुणाचाच आधार नाहींसा होऊन काय करावें तें कांहींच सुचेनासें झालें. सर्व संसाराची जोखीम कधींही आजपर्यंत अनुभव नाहीं अशा आह्मां अल्लड पोरांवरच येऊन पडली. हा सर्व पसारा आतां आटपावा तरी कसा. गुलाब तर तसा चमत्कारिक मनुष्य, त्याचा आमचा नेहमीं बाराचा चंद्र. छत्तीसाचाच आपला आंकडा. कधीं एकमेकांचीं मतें जुळायचीं नाहींत, तेव्हां ह्या कठीण प्रसंगीं मला तो कसचा हातभार लावूं लागतो. कुसुम तर जाणून बुजून अबला स्त्री ! ती ह्या बाहेरच्या प्रकरणांत काय सह्य देणार ! तेव्हां काय करावें कांहीं सुचत नाहीं. बाबांच्या झालेल्या अकस्मात निधनाविषयीं गांवांत बरीच चर्चा सुरू आहे. वकीलाच्या सांगण्यावरून गुलाबचा संपत्तीचा हक्क त्यांनीं अर्जीवरून काढून टाकिला असं समजलें आणि तें खरेंही असेल. कारण, अलीकडे त्याची मुद्राच कांहीं चमत्कारिक झाली आहे. नेहमीं दांत ओंठ खात असतो. मग काय त्याच्या मनांत

आहे न कळे. पण बाबांचं मन तरी शेवटीं शेवटीं इतकें कसें पालटलें याचं नवलच वाटतं. त्यांचा सारा कटाक्ष कायतो मजवर आणि कुसुमवर होता. गुलाबवर ते तर अत्यंत प्रीति करीत असत. मग त्याला एक कवडीकही न देतां सर्व संपत्ती त्यांनीं आमच्या पदरांत घावी हें मोठें नवलच. काय असेल तें असो ही गोष्ट सर्वांच्या मनाप्रमाणें झाली. पण माझ्या मनाला कांहीं बरं वाटत नाहीं हें असं कां व्हावं ! ( समोर पाहून ) पण हा समोरून गुलाबच येत आहे वाटतं.

( गुलाब प्रवेश करतो. )

गुलाब— ( रागानें लाल होऊन स्वतःशीं ) खरोखर मी पुरता सूड उगवीन. मला हे असले लपंडाव मुळींसुद्धां खपायचे नाहींत. म्हाताऱ्यानें स्वतः मरूनचे मरून त्यांत आणखीं मलाही पक्का दगा दिलान. मदनाला त्यानें घरांतून घालविला तेव्हांच त्याचा पैशावरचा हक्क नाहींसा केला होता, ही गोष्ट साऱ्या जगाला माहीत आहे. हे कोणी तरी कपट केलें आहे. कपटानें बाबांच्या कडून मरतांना तें मृत्युपत्र फिरून घेतलें आहे, यांत बिलकूल शंका नाहीं. आणि तें सर्व कुसुमचेंच काम हें मी पक्कें जाणतों. आजारी-पणांत ती कारटी नेहमीं त्यांच्याजवळच बसून असे. वरून लोकांना आपला मोठा लोभ पाघळतो आहे, असें दाखवून आंतून हा असा मतलब साधून घेतला ! चिंता नाहीं. शेवट-पर्यंत मी त्यांचा शत्रु होऊन भांडीन, पण अशा रीतीनें माझ्या हक्काची पायमल्ली केली जाऊन ही संपत्ती त्यांना मी कधींही पचूं देणार नाहीं. त्यांचा पुरता पिच्छा पुरवीन तरच नांवाचा गुलाब !

( रागानें जाऊं लागतो तोंच समोरून मदन येऊन त्याचा हात धरतो. )

मदन —गुलाब !

गुलाब—( रागानें त्याच्या हाताला हिसडा देऊन ) बस्स, चल सोड मला. कशाला माझ्याशीं असलं तुझं मान-भावीपणाचं भाषण हवं आहे ? तिकडे मुलखावर टळला होतास तो ह्या कांचनपुरच्या किनाऱ्यावर पाय देण्याचं तरी कोणचं तुझं एवढं अडलं होतं ? रागानें जो इथून निघालास तो पुन्हां कशाला ही झक मारलीस. कशाला फिरून आपलें तोंड दाखिवलेंस ? तुला तिकडेस बुडवून तळाशीं नेण्यापुरतें समुद्रांत पाणी नव्हतें असें नाहीं ! चल सोड माझाहात—

मदन— ( आश्चर्यानें हात मागें काढून ) काय ह्या तुझ्या ह्मणण्याचा अर्थ ?

गुलाब— अर्थ काय ? फिरून तुझी ह्या ठिकाणीं काय जरूर होती ? बाबांनीं जेव्हां घरातून घालवून दिलें तेव्हां जन्मभर वाटेल तिकडे पोटाला मिळवून रहाण्याचा मोठा बाणा मिरवून दिमाखानें घरांतून पाय काढलास, मग इतक्यांतच तिकडे फांके पडण्याची वेळ कशी आली ? ह्मटल्याप्रमाणें कष्ट करून राहण्याचें जिवावर येऊन बाबांचा मृत्यु होतांच लोटून दिलेल्या संपत्तीकरतां कशाला धांव मारलीस ? जिथून पाऊलही ठेवायचें नाहीं असा निश्चय करून निघलास, तिथेंच फिरून नाक मुठींत घेऊन येण्याइतका बेशरमपणा कसा स्वीकारलास ? कांहीं नाहीं, मी सर्व जाणून आहे. तुझ्या कृतीचा तुला लागलाच पश्चात्ताप होऊन फिरून पैशाचें विचार मनांत येतांच तुझ्या

तोंडाला पाणी सुटलें ! व आपल्यातर्फे तुझ्याकरतां मरणाऱ्या त्या कारटीला— कुसुमलाच घरांतल्या घरांत असा प्रकार करण्याला तूं शिकीवलंस, यांत शंका नाहीं. तिनेंच ती तुझ्या व आपल्या दोघांच्याही फायद्याकरतां बाबांच्या आजारी-पणांत त्यांचें मन तितकें खंबीर नसल्यामुळें युक्ती युक्तीनें तें वळवून आपल्या तर्फेच्या त्या मृत्युपत्रावर दगलबाजीनें त्यांची सही करून घेतली व माझा पूर्ण हक्क असतांना मला अजिबात धाब्यावर बसविलान पण हें मी कसें सहन करूं. ती केवळ मानलेली कारटी आणि मी त्यांचा प्रत्यक्ष मुलगा असतां माझ्या पेक्षांही आज तिची योग्यता जास्त झाली. हा अन्याय निमुटपणें पहात मी कसा स्वस्थ बसेन?

मदन— ( अंमळ आवेशानें ) गुलाब ! शुद्धीवर राहून बोल. एखाद्या रानटी पशूप्रमाणें कांहीं एक विचार न करतां क्षुल्लक कारणाकरतां चिडून जाऊन वाटेल तशी बडबड करीत सुटणें हें ठीक नाहीं. तूं ह्मणतोस हें निव्वळ खोटं आहे. कुसुमच्या हांतून असलें कृत्य कधींही होणार नाहीं. आणि मी काय करीत आहे याचीही शुद्धी नाहीं, अशा स्थितींत कशीबशी दुसऱ्याच्या सांगण्यावरून केलेल्या मृत्यूपत्रावर सही करून घेण्याइतका तो वकीलही मूर्ख नव्हता.

गुलाब—कुसुमची तारीफ तूं करूं नयेस तर कोणी? कारण, हे तुझ्यावर तिचे केवढे तरी उपकार झाले आहेत. खरोखर तुझ्याच्यानें या जन्मीं तरी ते फिटणार नाहींत— माझी अगदीं बालंबाल खात्री आहे, कुणी कांहींही ह्मणोत, बाबांच्या आकस्मिक मृत्यूला कारण ती व तो तिचा प्रिय-कर—तो हरामखोर शिरक्या, हीं दोघेंही बऱ्याच अंशी

कारणीभूत झाली आहेत. निजेतोंपर्यंत त्यांची प्रकृती चांगली सुधारण्याच्या पंथाला लागली होती व पहाटेसच एकाकीं त्यांचा मृत्यु कसा ओढवेल ? इथेंच कांहीं तरी दगलबाजी झालेली आहे. त्यांच्या मरणानें फायदा होणारे तुह्मीच दोघें-जण अहा. तूं त्याबद्दल तिला कांहीं तरी देत असावास, आणि तुझ्याच सांगण्यावरून बाबा आपल्या आजाराच्या भरांत असतांना ह्या कुसुमनें त्यांना विषप्रयोगसुद्धां केला असावा.

मदन— ( रागानें लाल होऊन ) कोण हे भयंकर आरोप ! खरोखर असले शब्द मजपुढें उच्चारण्याला तुझ्या मनाला थोडी तरी शंका वाटली पाहिजे होती. तूं अगदींच बेफाम झालास. अरे हरामी कारट्या. चल माझ्या समोरून चालता हो.

( असें ह्मणून त्या आवेशांत गुलाब रस्त्याच्या बाजूला असलेल्या पुलाच्या अगदीं काठांवर उभा आहे इकडे लक्ष न जाऊन, त्याला एक धक्का देऊन पुढें रागानें निघून जातो, त्यासरशीं अंमळ बेसावधपणें उभा असलेला गुलाब तोल जाऊन खालीं कोलमडून पडतो. )

धोंडीबा— ( जवळच कोयत्यानें गवत कापीत बसला असतां कुणी पडल्याचा आवाज ऐकून तसाच घाईनें हातांत कोयता घेऊनच गुलाबाजवळ येतो व त्याच्याकडे निरखून पाहून रागानें ) हा कोण ? अरे हा चांडाळ ! तोच नराधम गुलाब आहे, यांत शंका नाहीं. हा माझा महान अपराधी आहे. जराही कांकूं न करतां अत्यंत क्रूरपणानें

यानें मागें एकदां माझ्या काळजाचा लचका तोडून घेतला आहे. आतां पक्काच माझ्या तावडींत सांपडला. आतां कुठे जाणार ! त्याबद्दलचा सूड उगवून घेण्यांची ही अनायासें आलेली संधी मी वाया कधींहि जाऊं देणार नाहीं. मग त्याबद्दल उद्यां मी फांशी गेलों तरी बेहेत्तर ! नाहीं तरी मला आतां जगून काय करायचें. कुणाच्या आशेवर दिवस कंठायचे ! गुलाबकडे पाहून ) बस्स ! कांहीं नाहीं आज याचा मृत्यू माझ्या हातांनीं खास ठरला आहे. अधमा राक्षसा तुला स्वर्गाची वाट दाखविण्याला ही माझी कोयती आज अशा रीतीनें साक्षकर्ती झालीच समज—

( असें ह्मणून रामानें हातांतली कोयती गुलाबच्या पोटांत खुपसून त्याचा प्राण घेतो. ) बस्स ! झालं माझं काम. मी आपलें कर्तव्य करून आज मोकळा झालों. ( निघून जातो)

---

## प्रवेश २ रा.

::0::

( वसंत प्रवेश करतो. )

**वसंत**—काय ही बातमी ! जाधवराव शिपाला मरून पुरता आठवडाही अजून झाला नाहीं, तो इकडे एकाएकीं गुलाबचा खून ! ! हें काय असेल ! त्याचा खून—कोणी केला असेल ! आपल्या दुष्ट, तिरसट स्वभावानें त्यानें पुष्कळांशीं वैर संपादन केलें होतें खरें, पण खून करण्यापर्यंत त्याची कुणी मजल आणील असं कांहीं वाटलं नव्हतं. झालं. एकूण अशा रीतीनें त्याचा शेवट झाला. ह्या मृत्युमुळें गांवांत बरीच चळवळ सुरू आहे, ज्याच्या त्याच्या तोंडीं शिपाच्या

आकस्मित मृत्यूशिवाय दुसरा विषयच नाहीं. ( समोर पाहून ) पण हा कोण घाइघाईनें माझ्याकडेसच येत आहे ! हा दौलतराव.

( दौलतराव प्रवेश करतो. )

दौलत०— वसंतराव, तुह्माला कांहीं समजली की अगदीं ताजी बातमी ? फार वाईट गोष्ट झाली बोवा, काय होईल तें होगो.

वसंत— ( उत्सुकतेनें ) ह्मणजे काय गुलाबच्या खुनाबद्दल ना ? होहो. गोष्ट वाईट तर खरीच.

दौलत०— गुलाबचा तर खून झालाच, आणि तो कुणी केला असेल, तें त्या परमेश्वराला माहीत, पण कांहीं कोरड्या संशयावरूनच त्याबद्दल शिपायांनीं आपल्या मदनला धरून नेलें आहे, आजच्या आज खटल्याची चौकशीही होणार ह्मणून ऐकतों.

वसंत०— ( एकदम चपापून ) काय ! मदनवर खुनाचा आरोप ठेवून त्याला शिपायांनीं नेला ! ह्मणजे ही निव्वळ झोटिंगबादशाई होणार कीं काय ! याला कांहीं साक्षीपुरावे असतीलच कीं नाहीं ? छे. असं कसं व्हावं.

दौलत०— कसं व्हावं ! तीच तर मोठी आश्चर्याची गोष्ट आहे. मदनाच्या हातून असला घाणेरडा गुन्हा आणि तोही प्रत्यक्ष आपल्या भावाचा खून ! छे. मला नाहीं वाटत कधीं होईल ह्मणून. काय झालं असेल तें असो. कांहीं तरी त्यांना संशय आला असेल.

वसंत— पण संशय तरी मी ह्मणतो कशासंबंधें, येणार ? अहो नुकते पांच सहा दिवसच त्याला इथें येऊन झाले असतील. बरं पैशाची लालूच ह्मणावी तर तें

मुळींच संभवत नाहीं. कारण, मृत्युपत्रांत जाधवरावनें पूर्वीच त्याच्या नांवांनीं सर्व करून ठेवलें आहे असें ऐकतों. काय हो ? ही केव्हांची गोष्ट ? मला वाटतं, आईला, कुसुमला वगैरे समजलं सुद्धां नसेल हें.

दौलत०—मनोरमाबाईना समजलं असेल कीं नाहीं काय जाणें. कारण, नुकतांच हा प्रकार घडला आहे; पण कुसुमला कदाचित् कळला असेल, आणि तिला कळूनही उपयोग काय. वसंतराव ! तें कांहीं नाहीं. स्वस्थ बसण्यांत कांहीं अर्थ नाहीं, आपणाला खटपट केलीच पाहिजे. बहुधा खून कसा झाला, काय झाला, केव्हां झाला, याची बारकाइनें चौकशी करण्याकरतां सरकारांतून तुह्मालाच डाक्तर ह्मणून बोलावणें येईल इतक्यांत. तेव्हां तुह्माला ती खटपट अनायासेंच करावी लागणार आहे. तोंपर्यंत मीही इकडे कांहीं वकीलबिकील करून पाहतों साधलेंतर.

वसंत—पण खटल्याची चौकशीही आजच्या आज होणार आहे ह्मणतां ? ह्मणजे मध्यें कांहींच वेळ राहिला नाहीं.

दौलत०— वेळ तर नाहींच, पण आतां आहे तेवढ्यातच शक्य तेवढी खटपट केली पाहिजे. मृताची चौकशी करतांना कांहीं फायदा मिळण्यासारखा असल्यास, तो तुह्मी दवडणार नाहींच. मी ह्या माधवराव वकीलाकडे आतांच जाऊन ठरवून टाकतो. अहो, मदनच्या हातून हा गुन्हा घडून येण्याला कांहींच तसें कारण दिसत नाहीं.

वसंत—पण हेंच तुमचें ह्मणणें न्यायाधीशापुढें सिद्ध झालें पाहिजे. नाहींतर उपयोग काय आपली आपल्याच ठिकाणीं खात्री असून ! त्यांच्या डोक्यांत जी कल्पना उतरेल ती खरी, ते जें बोलतील तें सत्य व करतील तोच

न्याय मानला जातो. तुमचं ह्मणणं त्यांना पटलं पाहिजे ना !

दौलत०— अहो, कसला न्याय आणि कसलं काय, जसा पुरावा तसा न्याय. एखाद्या लहान मुलालाही तो देतां येईल. पुरावा खरा आहे कीं, खोटा आहे इतकी बारीक चौकशी कोण करतो. कांहीं नाहीं, अलीकडे ह्मटलें ह्मणजे आपली बाजू खरी असून सुद्धां ती अगदीं झूट ठरते. नशीबच बलवत्तर पाहिजे. दुसरं कांहीं नाहीं, एरवीं न्यायाधीशही त्यांतलेंच आणि वकीलही त्यांतलेंच.

वसंत — पण उपाय काय ! त्याशिवाय गत्यंतर नाहीं. लोकांना तंटे आपसांत सलोख्यानें मिटवितां येत नाहींत; ह्मणूनच ह्या न्यायसभा, पंचांनीं दिलेला उपदेश, त्यांनीं केलेला न्याय आह्माला मान्य होत नाहीं; ह्मणून त्या न्याया-धीशांना हजार लोकां देखत तोंड दाखवून आपलेच गुण-दोष बाहेर आपल्या हातांनीं आणावे लागतात आणि ह्मणूनच तरी ह्या वकीलांची मनधरणी करून शुष्काशुष्क लाभाचा स्वीकार करावा लागतो. तसं नसतं तर कांहींच जरूर नव्हती.

दौलत०— पण आतां विचार करून कामाचें नाहीं. असल्या प्रसंगाला हिमतीनें तोंड दिलं पाहिजे. तुह्मी जाच आतां, आपल्या तयारीनें असा. मीही आपल्या कामाला लागतो. न्यायसभेची वेळ काय हां हां ह्मणतां होईल.

वसंत — चला तर, हा मी चाललोंच. एकंदरींत कल्पनेच्या बाहेरचाच हा प्रसंग आला ह्मणायचा. असो. परमेश्वर समर्थ आहे.

( दोघे दोहोंबाजूंनीं निघून जातात. )

---

# प्रवेश ३ रा.



स्थळ—न्याय कचेरी.

( न्यायाधीश स्वस्थांनीं बसले आहेत, जवळ अपघाताची चौकशी करणारा उभा आहे. एका बाजूला माधवराव वकील व दौलतराव आणि वसंतराव आहेत. दुसऱ्या बाजूला शिपायांनीं मदनाला उभें केलें आहे, आणखी एकदोन साक्षी आहेत असा प्रवेश होतो. )

वसंत—( दौलतरावाला हलकेंच ) दौलतराव ! ह्या खुनाशीं मदनाचा चांगलाच संबंध आहे; अशाबद्दल उलटपक्षी साक्षीदार सुद्धां तयारच आहेत !

दौलत०—हो बोवा, आहेत खरं, मग त्यांनीं तो प्रकार कुठं कसा पाहिला असेल व हें तरी इतक्यांतच साक्षीदार ह्मणून कसे आणले गेले, याचं आश्चर्यच वाटतं. एकून प्रकरण तर कठीणच दिसतें.

न्यायाधीश—काय हो ! आज करण्यामारखे असे कांहीं जुने महत्त्वाचे खटले आहेत कां अजून शिल्लक ?

शिरस्तेदार—एकदोन आहेत, पण ते कांहीं विशेष महत्वाचे नाहींत. एक तो ठमा मागणीच्या शेतावर सोम्यानें कांहीं कर्जाऊ पैशासंबंधीं जप्ती आणल्याचा, आणि दुसरा तिमाजी नाईकाच्या इथें झालेल्या चोरींत सामील असल्याबद्दल पकडलेल्या सोम्याच्या साक्षी कांहीं व्हायच्या राहिल्या आहेत. आजच ती तारीख आहे.

न्यायाधीश— अं: एवढेचना ? त्यांत कांहीं विशेष नाहीं, ते दोन्हीही पुन्हा तारखेवर लावा.

शिरस्तेदार— एवढेच दोन. यापेक्षां कांहीं जास्त नाहींत. लावतों तें दोन्ही तारखेवर.

न्याया०— त्यापेक्षां आजचा आलेला खटला फार महत्वाचा आहे. जाधवराव शिंदे ह्मणजे कांचनपुरांत चांगलेच प्रसिद्ध गृहस्थ होते, त्यांच्या मुलाचाच प्रत्यक्ष खून! आणि तोही अशा रीतीनें एकदम तीनचार दिवसाच्या आंत ह्मणजे विचार करण्यासारखी गोष्ट आहे.

( जवळ उभा असलेल्या अपघाताची चौकशी करणाऱ्याला ) हं करा तर तुह्मी चौकशीला सुरवात. वेळ गमावतां कामा नाहीं.

अ० चौ०— ( मोठ्यानें खुनासंबंधी पहिला साक्षीदार रेम्याडोक्या ह्मटलेला आहे तो कोण आहे ?

( मदनाच्या बाजूला उभा असलेला एकजण पुढें होतो. )

प० साक्षीदार— मी आहें सरकार.

अ० चौ०— रेम्याडोक्या पाठकर तुझंच नांव आहे ! बरं तुझा धंदा काय ?

प० सा०— थोडकीशी असलेली वडिलोपार्जित शेतीकरून त्यावर पोट भरीत असतो; सरकार !

अ० चौ०—जिथें हा खून झाला त्या जागेपासून तुझी शेती किती दूर आहे.

प० सा०— तरी बरीच लांब—रासरी अर्धा एक कोस तरी असेल, सरकार.

अ० चौ०— हा खुन झालेला तूं कुठें पाहिलास ! काय तुला त्याविषयीं माहिती आहे ! सर्व सांग.

प० सा०—खून मिटगंजाच्या टाक्यापाशीं झालेला मी पाहिला. माझ्या शेताकडे जाण्यायेण्याचा तोच मार्ग आहे.

अगदीं पहाटेची वेळ मी घरून आपल्या शेतीकडे जाण्याला निघालों असतांना त्या ठिकाणीं सडकेवर पुलाजवळ दोन माणसें एकमेकांशीं रागारागानें कांहीं बोलत आहेत असें पाहिलें, कशासंबंधानें तरी त्यांचा तंटा चाललेला होता. गोष्ट अरेतुरेपर्यंत आली होती, पण अशा भानगडींत आपलें काम सोडून मी कधींच पडत नसल्यामुळें मी तो आपला असेल कुणाचा साधारण तंटा ह्या समजुतीनें तिकडे विशेष लक्ष्य न देतां तडक आपल्या शेतावर कांहीं जरूरीचें काम असल्यामुळें चालता झालों.

अ०चौ० —बरं मग पुढें? खून होतांना तूं कुठें पाहिलंस?

प०सा०—खून होतांना मी मुळींच पाहीलं नाहीं. आपल्या कामावरून कांहीं वेळानें मी परत येत असतांना त्या ठिकाणीं येऊन पाहतों तों एक गृहस्थ पुलाखालीं गवतावर मरून पडला आहे व आसपास दुसरे कोणीही नाहीं असें पाहिलें. नुसत्या तोंडी भाषणाचा इतका परिणाम झालेला पाहून मला फारच आश्चर्य वाटलें; पण आपल्याला काय करायचें आहे ह्मणून मी तिथून निघालों झालं. इतकीच कायती त्यासंबंधाची मला असलेली खरी खरी माहिती सरकारापुढें मी दिली आहे.

अ० चौ०— बरं, पण त्या दोघांचं जें तूं भांडण होतांना ऐकलंस त्यावरून पुढें खुनापर्यंत त्याची मजल येईल असं तुला वाटलं होतं कीं नाहीं व वाटलं असल्यास त्यांना तूं प्रतिबंध कसा केला नाहींस ?

प० सा०— दुसऱ्याच्या कारभारांत उगीच हात घालण्याची मला कधींच संवय नाहीं हें मी पूर्वींच सांगितलें आहे. शिवाय त्यांचं जें भांडण चाललें होतें तें ह्मणजे

पुढें इतक्या थरावर जाईल असं मला मुळींच वाटलं नाहीं.

अ० चौ०— त्या दोघांपरतां तिथें दुसरें मनुष्य कुणी होतें कीं नाहीं ? तंटा करीत असतां त्यांच्या हातांत कांहीं हत्यारवित्यार तूं पाहिलंस ?

प० सा०—तिसरें मनुष्य त्या वेळेला तिथें कोणीही नव्हतें व हत्यार मला तर कांहींएक दिसलें नाहीं.

अ० चौ०— बरं त्या भांडणाऱ्या दोघां मनुष्यांना तूं पक्कें ओळखलंस कीं नाहीं ? ते कोण होते हें तूं सांगूं शकशील कीं नाहीं ?

प० सा०— हो, त्यापैकीं एकाचा तर खून झालेला पाहिला व दुसरा मनुष्य ( मदनकडे बोट दाखवून ) हा धरून आणलेला आरोपी मी ओळखिता.

अ० चौ०— मग ह्याच मनुष्यानें त्या दुसऱ्याचा खून केला हें सिद्ध होतं तर ?

प० सा०— हें मी कसं सांगणार खून होतांना मी मुळीं पाहिलाच नाहीं.

न्यायाधीश- ( हें सर्व भाषण लिहून घेऊन ) ठीक आहे तें असूं द्या. ( वसंतरावाकडे वळून ) वसंतराव! तुमची सल्ला ह्या कामीं घेणं फार जरूरीचं आहे !

वसंत- काय तें विचारावें, माझ्या बुद्धीला जें कांहीं वाटत आहे तें सर्व मी सांगेन.

न्यायाधीश— दुसरं कांहीं नाहीं. खून झालेल्या मनुष्याला तुह्मी बारकाईनें तपासलंच आहे. हा खून कशामुळें झाला असावासा तुह्माला वाटतो.

वसंत- एकंदर सर्व चिन्हांवरून चौकशी अंती पाहतां कुणी तरी मोठा सुरा किंवा एखादा कोयता पोटांत खुपसून

प्राण घेतलेला आहे हें अगदीं उघड आहे. त्या शस्त्राचा मोर मयताच्या अगदीं काळजाला भिडलेला असावा.

न्यायाधीश— प्रेताची तुह्मी तपासणी करण्याच्या अगोदर किती वेळ तो मनुष्य मरून झालेला असावा असें तुह्माला वाटतें?

वसंत— सरासरी दहांच्या सुमारास मी प्रेताची तपासणी करण्याकरतां गेलों, तेव्हां खून मला वाटतें तीन एक तास तरी अगोदर झाला असावा.

अ० चौ०— कदाचित् यापेक्षांही अगोदर झाला असेल; नाहीं कशावरून? मयत आरोपी बरोबर भाषण करीत होता ती पहाटेची वेळ होती.

वसंत— तरी काय हरकत आहे! तीन तासाहून जास्त वेळ झाला असेल असें मला मुळींच वाटत नाहीं.

न्यायाधीश— कोणत्या शस्त्रानें प्राण घेतला असावा असं तुमचं ह्मणणं?

वसंत— मोठा सुरा किंवा कोयता; बहुधा कोयताच. हीं हत्यारें बहुधा गरीब लोकांच्या वापरणींत—किंवा शेतकरी झाले—अशा लोकांजवळ असण्याचा संभव फार.

न्यायाधीश— (तें लिहून घेऊन) समजलों मी. ह्या सर्व गोष्टी तर आरोपीवर खुनाचा आरोप चांगलाच लागू करतात, पण आणखीही यासंबंधानें बरीच चौकशी झाली पाहिजे. (शिपायांच्या जमादारास उद्देशून) कायहो! खून झाला ती जागा तपासण्याकरतां तुह्मी तिथें गेलांत; तेव्हां चौकशी अंती तुह्माला काय खुनासंबंधानें पत्ता लागला?

जमादार— सरकार! खुनासंबंधीं दुसरा तर कांहींच पत्ता नाहीं. पण ज्या जागेवर हा खून झाला त्या जागेपासून

सरासरी दहा पंधरा कदमाच्या अंतरावर ही एक आंगठी मात्र पडलेली मला सांपडली. ( आंगठी काढून न्यायाधीशाला देतो. )

**न्यायाधीश**— ( आंगठी पाहून व तिजवरील नांव वाचून चकीत होतो ) हें काय ! ह्यावर " म० शिं० " अशी दोन अक्षरें खोदलीं आहेत. याचा अर्थ मदन शिंदे असाच पाहिल असतां होतो (लिहून घेऊन)हा एक दुसरा मुद्दा !

**मदन**— ( तें पाहतांच चपापून आपल्या हातांकडे पाहतो. हातांत आंगठी नाहीं असें पाहून चकित होऊन मनांत ) हायहाय ! सर्वच गोष्टी कशा विपरीत घडून आल्या ह्या ! त्या साधारण बोलाचालींत त्याच ठिकाणीं माझ्या हातांतील आंगठी सुद्धां गळून पडावी ह्यासारखें माझें दुसरें दुर्दैव कोणतें ! एकंदरींत कांहींएक अपराध नसतांना मी ह्या सर्वस्वाला आंचवून शेवटीं अशातऱ्हेनें फांसावर लटकून मरणार आं ? अरे अरे ! काय करूं ! माझ्याकडे कांहींएक अपराध नाहीं हें मी कसें सिद्ध करून दाखवूं ! ( इतक्यांत आरोपीतर्फेचे वकील माधवराव उभे राहतात ).

**माधवराव वकील**—सरकार ! इतरांप्रमाणें मलाही चार शब्द बोलण्याची मेहेरबानी असावी.

**न्यायाधीश**— आपण कोण ? आपलें नांव काय ?

**माधवराव**— मी आरोपीतर्फे वकील आहें. माझें नांव माधवराव बाळवेकर.

**न्यायाधीश**— ठीक आहे. काय आपल्याला बोलायचें आहे ?

**माधवराव**— विशेष कांहीं नाहीं. आरोपीच्या विरुद्ध ह्मणून ज्या दोनचार गोष्टी सांगण्यांत आल्या त्या संबंधानें

मला चार शब्द बोलावयाचे आहेत. पहिला साक्षीदार रेमाडोक्या पाटकर यानें आरोपीला मयताबरोबर सडकेवर मिटगंजाच्या टाक्यापाशीं बोलतांना पाहिलें, ती गोष्ट अगदीं अरेतुरेवर कदाचित् आली असेल, पण खून झाला तो तिथून बराच लांब ह्मणजे खालच्या बाजूला गवतावर सरासरी सडकेपासुन पंधरावीस किंवा जास्तच कदमावर झाला. त्यावेळेला जर जवळपास दुसरें मनुष्य कुणीही नव्हतें तर भांडत असलेलें ठिकाण सोडून आरोपीचा मयताला तिथेंच न मारतां इतक्या लांब नेऊन मारण्यांत कांहींच मतलब नव्हता. तो त्याचा प्राण तिथें सुद्धां घेऊं शकला असतां. एक गोष्ट. दुसरी, आरोपी आणि मयत हे दोघेही सख्खे भाऊभाऊ आहेत. त्यांना एकमेक भांडून खून करण्याचें कांहींच कारण नव्हतें. जाधवराव शिंद्यानें आपल्या मृत्युपत्रांत संपत्तीचा वारस मदनला ह्मणजे आरोपीला केला ही गोष्ट जाहीरच आहे. तेव्हां आरोपीनें पैशाच्या लालचीनें मयताचा ह्मणजे आपल्या प्रत्यक्ष भावाचा खून केला असेल हें मुळींच संभवत नाहीं. शिवाय तिसरी मुख्य गोष्ट ह्मटली ह्मणजे डाक्टर वसंतरावनीं मयताची तपासणी करण्यांत सांगितलें कीं खून, मोठा सुरा किंवा कोयता, जीं हत्यारें बहुधा गरीब लोक किंवा शेतकरी यांच्याजवळ असण्याचाच संभव फार, यांच्या योगानेंच झालेला आहे, आणि त्या हत्याराचा घांव मयताच्या काळजापर्यंत भिनलेला होता. या गोष्टींवरून पाहतां तो खून आरोपीनें मुळींच केला नाहीं असें स्पष्ट सिद्ध होतें. कारण, आरोपीजवळ हत्यार वगैरे कोणत्याच तऱ्हेचें नव्हतें हें साक्षींत आलेंच आहे. एकंदरींत ह्या सर्व गोष्टींचा चांगला

विचार करून पाहिला असतां आरोपी अगदीं निर्दोष आहे असे ह्मणायला कांहींच हरकत नाहीं.

न्यायाधीश— तुह्मी ह्मणतां हें सर्व खरें, पण आरोपीं-विरुद्ध जो कांहीं पुरावा समोर आला आहे, त्यावरून पाहतां माझी आपण ह्मणतां तशी खात्री होत नाहीं. एकतर खून झाला तेव्हां आरोपीशिवाय त्याठिकाणीं दुसरें कोणीही नव्हतं. खून होण्याच्या अगोदरची गोष्ट ह्मणजे मारामारी किंवा तंटा होत असलेला ह्या साक्षीदारानें प्रत्यक्ष आपल्या डोळ्यांनीं पाहिला. तेव्हां भांडण यांच्यामध्यें होत असून तिसराच मनुष्य येऊन खून करील हें शक्य नाहीं. शिवाय भांडणाची वेळ व खून झाला ती वेळ जवळ जवळच जुळतात. त्याशिवाय मुद्याची आणखी एक गोष्ट आरोपीची त्या ठिकाणीं पडलेली आंगठी होय. ही आंगठी आरोपीची आहे यांतत्तर मुळींच शंका नाहीं. कारण तिच्यावर याचें नांव स्पष्टपणें खोदलेलें आहे. पैशासंबंधानें खून करण्याची आरोपीला कांहीं गरज नव्हती ही गोष्ट खरी, पण उभयतां भावांभावांमध्यें पूर्वीपासूनच वितुष्ट होतें, दोघांचे नेहमीं तंटे बखेडे चाललेले असत ही गोष्ट प्रसिद्धच आहे. हत्यारासंबंधानें तुह्मी ह्मणतां पण हत्यार त्याजजवळ गुप्तपणें नसेल ह्मणून कशावरून ? एकंदरीत ह्या सर्व गोष्टी माझ्या मतानें आरोपीवर पूर्णपणें लागू होतात.

माधवराव—पण मोठा सुरा, किंवा कोयता अशा प्रकारचें हत्यार आरोपीसारख्या श्रीमंत मनुष्याजवळ असेलसें संभवनीय नाहीं व एवढें मोठें हत्यार मुद्दाम खून करण्याच्याच इराद्यानें त्यानें घरून लपवून नेलें असेल, ही गोष्ट त्याच्या

आजपर्यंतच्या गांवांत प्रसिद्ध असलेल्या सुशील वर्तनाव-रून अगदीं खोटी असावी असें निदान मलातर वाटतें.

न्यायाधीश--हें वाटतें ह्मणणं ह्मणजे कांहीं सिद्ध करून दाखविणारा पुरावा नव्हे. पुरावा सर्व अगदीं विरुद्ध आहे, तेव्हां संशयाला मुळीं जागाच नाहीं. तुमचें ह्मणणें तुह्मी दुसऱ्या तऱ्हेनें सिद्ध करून दाखवूं शकतां का?

माधव--दुसऱ्या कोणत्या तऱ्हेनें सिद्ध करून दाखविणार? माझ्या मताप्रमाणें मला वाटल्या त्या सर्व गोष्टी मी बोलून चुकलोंच आहे. आणि त्यांवरून माझ्यामतें आरोपी निर्दोषी असावा असं मानण्याला कांहीं हरकत नाहीं, यानंतर जसं आपलं मत असेल त्याप्रमाणें.

न्यायाधीश--तुह्मी ह्मणतां त्या गोष्टी ह्मणजे नुसते संशय, तो कांहीं पुरावा नव्हे, आणि याचकरितां त्यावर माझा विश्वास बसं शकत नाहीं, तिथें निरुपाय आहे. (मद-नला उद्देशून) याजवर तुझें कांहीं ह्मणणें आहे काय?

मदन--माझें ह्मणणें काय असणार. माझ्या मनाची जरी मी निर्दोषी असल्याबद्दल पक्की खात्री आहे, तरी वकील-साहेबांना उत्तर मिळाल्यावरून माझें ह्मणणें सबळ पुरावा अशा प्रकारें मी आपणांपुढें मांडू शकत नाहीं हें उघडच आहे. ह्याशिवाय दुर्दैवानें माझ्या निर्दोषीपणाचा पुरावा मजजवळ आपणाला सांगण्याला नाहीं ह्याबद्दल फार वाईट वाटतें.

न्यायाधीश--असो, एकंदरीत ह्या सर्व गोष्टींच्या पूर्ण विचारांतीं आरोपी ह्मणजे मदन ह्यानें आपल्या भावाचा खून केला हें सिद्ध झालं, आणि या अपराधाबद्दल कायद्या-प्रमाणें त्याला मी फांशीची शिक्षा देतों. (शिपायांस) चला, कैद्याला घेऊन जा.

( हें ऐकतांच सर्वांना फार वाईट वाटतें. दौलतराव वसंतरावाकडे खिन्न मुद्रेनें पहातो. ) ( इतक्यांत दुरून कोणी 'थांबा, थांबा, भलत्याच मनुष्याला नेऊं नका, अशी हांक ऐकूं येते. धोंडीबा प्रवेश करतो. )

धोंडीबा—( एकदम मोठ्यानें ) थांबा, थांबा, असा भलताच अन्याय करूं नका ! खून झाला कुणाचा, केला कुणी, आणि शिक्षा कोणाला देता, सर्वच कांहीं अंधेर. ही फांशीची शिक्षा भलत्याच निरपराध मनुष्याला झाली आहे आणि न्यायाच्या दृष्टीनें पाहतां हें मुळींच ठीक नाहीं. सोडा त्याला. ( त्याला पाहतांच सर्व आश्चर्यचकित होतात.)

दौलत०—( एकीकडे ) वसंतराव! हा काय चमत्कार! मरणोन्मुखाच्या तोंडांत जशी एकाकीं अमृतवृष्टी व्हावी तसंच हें होऊं पहात आहे. पण आपण होऊन अशा रीतीनें पुढें येणारा हा कोण असावा !

वसंत—साराच चमत्कार ! हे नशीबाचेच खेळ, दुसरें काय ! असो हा काय ह्मणतो तें तर ऐकूं, नाहींतर मग आहेच.

न्यायाधीश—( मोठ्यानें ) कोण आहेस तूं ? आणि भरन्यायसभेंत अशा रीतीनें एकदम ओरडून दंगा करण्याचा काय अर्थ ?

धोंडीबा—कसली न्यायसभा ! न्यायसभा असती तर धडधडीत अशा रीतीचें भलतेच प्रकार कधींही घडून आले नसते आणि न्यायाधीशासारखं जोखमीचें व हुशारीचें काम अक्कल असल्याशिवाय आपल्या ताब्यांत घेऊन व्यर्थ पापाचे घडे ज्यास्त वाढूं देणें तुमच्या हातचं चुकवावं ह्मणूनच आज मलाही अशी अकस्मात ओरडून गडबड करण्याची वेळ

आली आहे. हा कमला न्याय ! यांच्या संबंधानें हा धडधडीत अन्याय झालेला आहे, पण तसा व्हावा अशी माझी मुळींच इच्छा नाहीं. शक्य आहे तोंपर्यंत निरपराध मनुष्याला मी कधींच फांशी जाऊं देणार नाहीं.

न्यायाधीश— ठीक आहे, तर यासंबंधानें तुला काय माहिती आहे ? तुझें काय नांव आहे ? तें सर्व सांग.

धोंडीबा— ऐका. तें सर्व सांगण्याकरतांच जेव्हां मला हा असा प्रकार समजला, तेव्हां मी धांवत इकडे आलों. माझें नांव धोंडीबा. मी हमाम चौकानजीक एका लहानशा झोपडींत काबाडकष्ट करीत राहतों. आरोपीचा बाप जो जाधवराव शिंदे याच्या जवळ पुष्कळ दिवसांपूर्वी मी नोकर होतो, पण तशाच कांहीं कारणामुळें मला ती नोकरी सोडून स्वस्थ जें कांहीं नशीबानें मिळेल त्यांतच उदरनिर्वाह करून रहावें लागलें.

न्यायाधीश— बरं आरोपीसंबंधानें तुला काय काय सांगायचें आहे ? ध्यानांत ठेव, तूं जें जें सांगशील तें सर्व तुझ्या विरुद्ध धरलें जाईल.

धोंडीबा— चिंता नाहीं, त्याबद्दल मला मुळींच काळजी नाहीं. आरोपीसंबंधानें हेंच सांगणें कीं, आरोपी अगदीं निरपराध आहे, त्यानें हा खून मुळींच केला नाहीं.

न्यायाधीश— ( आश्चर्यानें मध्येंच ) मुळींच केला नाहीं ! तर मग कुणी केला ?

धोंडीबा— सांगतों. तुम्ही स्वस्थ चित्तानें मी काय सांगणार तें ऐका. तो खून मी केला. गुलाबचा प्राण घेणारा मी पण मी त्याकरतां आपल्या जवळचा सुरा त्याच्या छातींशीं रोखून धरेपर्यंत माझी निव्वळ नशीब

• ( मदन मोकळा होतांच सर्वांना आनंद होतो. दौलतराव व वसंतराव त्याला एकदम येऊन भेटतात. )

( पडदा पडतो. )

---

# प्रवेश ४ था.

स्थळ— जाधवरावचा वाडा.

( कुसुम उत्सुकतेनें मदनची काय वाट झाली याविषयीं जिज्ञासायुक्त अशी बसली असतां मदन एकदम येऊन तिला भेटतो. )

कुसुम—अहाहा ! मदन ! तुझी माझी फिरून जिवंतपणीं भेट करविली, हे त्या ईश्वराचे कितीतरी उपकार मी समजूं ! मदन ! तुझ्यावर तो आळ येऊन त्याचा होणारा तो भयंकर परिणाम लक्ष्यांत आणतांच माझें काळीज तर केवळ फाटून गेलें होतें. अशा स्थितींत तुझी त्यांतून सुटका तरी कशी झाली !

मदन—सुटका ! त्या ईश्वरानेंच धांवून येऊन केली दुसरं कांहीं नाहीं. न्यायाधीशानें आह्मी केलेल्या सर्व प्रयत्नांला न जुमानतां त्या चमत्कारिक पुराव्यावरून मला फाशीची शिक्षा देतांच दुःखानें दौलतराव, वसंतराव इत्यादिकाची तोंडें केवळ करपून गेलीं. ते जिवाला धक्का देणारे भयंकर शब्द त्याच्या तोंडून बाहेर पडतांक्षणींच निराशेन अगोदरच म्लान झालेले त्यांचे चेहरे काळे ठिक्कर पडले. कांहीं एक सुचेनासें होऊन केवळ चित्राप्रमाणें एकमेकांच्या तोंडाकडे पहाण्यांतच त्यांचा बराच वेळ गेला. माझी स्थिति

त्यावेळीं काय झाली हें तर मला कधींहि वर्णन करून सांगतां यायची नाहीं. माझा गेलेला प्राण जणूं परत आला असें मला आतां वाटतें! कुसुम! दौलतरावनीं व वसंतरावनीं खरोखर माझ्याकरितां जिवापाड श्रम केले, पण त्यांचें त्यांना फळही चांगलें मिळालें, असें त्या अकस्मात घडून आलेल्या चमत्कारिक प्रसगावरून आतां मी ह्मणतों.

कुसुम—ह्मणजे असा काय तो चमत्कारिक प्रसंग?

मदन—माझ्या आयुष्यांत सर्वच प्रसंग चमत्कारिक घडून आलेले मला वाटतात. मला तो कोण असावा हें कांहीं ओळखतां आलें नाहीं, पण मी सुटल्यावर वसंतरावच्या सांगण्यात तो त्या नलिनीचाच बाप असावा असें आलें. नलिनीबद्दलची हकीगत व गुलाबचा त्यांतला संबंध तूं मला लिहून कळविलीच होतास.

कुसुम—हं. बरं मग? पुढें? काय त्यानें असें तुझ्याकरतां केलें?

मदन—माझ्याकरतां त्या बिचाऱ्यानें आपला प्राण खर्ची घातला. खरोखर आपलें मागलें वैर साधण्याकरतां—किंवा वैर तरी कसलें—आपल्या मुलीबद्दलचा पक्का सूड घेण्याकरतांच त्यानें गुलाबचा खून केला. रागानें गुलाब जवळून मी निघून आल्यामुळे काय झालें हें मला तेव्हां समजलें नाहीं, पण माझ्या धक्क्यानें पडलेला गुलाब त्याच्या जवळच कर्मधर्मसंयोगानें गडबडत गेल्यामुळें त्यानें ती संधी साधून सुऱ्यानें त्याचा प्राण घेतला!

कुसुम—(तें ऐकतांच अमळ दुःखित होतें) अगबाई! काय हें. अशा रीतीचें मरण!

मदन—त्यानें जेव्हां मला झालेली शिक्षा ऐकतांच

एकदम न्ययाधीशासमोर येऊन आपली सर्व हकीकत सांगून माझी सुटका केली, तेव्हां अशा रीतीनें माझ्या भावाचा—गुलाबचा खून केल्याबद्दलची हकीकत ऐकून माझ्या मुद्रां मनाला फार वाईट वाटलें. कुसुम ! गुलाब जरी दुष्ट होता, तरी गुलाबच्या अशा प्रकारच्या वाईट मृत्यूची आठवण रात्रंदिवस माझ्या मनाला सारखा त्रास देईल यांत शंका नाहीं.

कुसुम—एकंदरीत जें होणार तें कधींही चुकत नसतें एवढीच गोष्ट खरी. बिचारा गरीब स्थितींत दिवस काढणारा नलिनीचा बापही दुसऱ्याकरितां केवळ सर्वस्वाला आंचवला. मदन ! पण तुझी सुटका झाली, ह्यासारखी आनंदाची गोष्ट कोणतीच नाहीं.

मदन— ती मानुन घ्यायची तशी एवढेंच. असो. त्याबद्दल तरी आतां विचार करण्यांत काय अर्थ आहे ! जें झालें तें चांगलेंच झालें. कुसुम ! गुलाबला कांहींएक न देतां सर्व संपत्ती त्यांनीं मलाच कां दिली याबद्दल तुला कांहीं माहिती आहे ?

कुसुम—कांहीं नाहीं. मलासुद्धां हें नवलच वाटतं ( आठवल्यासारखें करून ) पण थांब अं. बाबांनीं मरणापूर्वी माझ्या जवळ तुला देण्याकरितां एक मोहोरबंद केलेला कागद दिला आहे, त्यांत कांहीं असल्यास न कळे.

मदन—असा कोणचा कागद तो ? आणि तूं सुद्धां अजून तो वाचला नाहींस ?

कुसुम—छेः तो कागद अगदीं बंद केलेला असून बाबांनीं फक्त तो तुलाच देण्याकरितां माझ्या स्वाधीन केला आहे. जर दुर्दैवानें तूं इथं येऊं शकला नाहींस तर मात्र

तो मी उघडून त्यांत लिहिल्याप्रमाणें व्यवस्था करायची असं तो कागद देतांना त्यांनीं मला बजावून सांगितलं आहे; तेव्हां आतां तो मी तुला आणून देतें. ह्मणजे त्यांत काय आहे तें तरी समजेल. ( जाते. )

मदन—( स्वगत ) खरोखर मी परत येतलों पर्यंत बाबा जिवंतच राह्यला पाहिजे होते, ह्मणजे सर्वच गोष्टी ठीक जुळल्या असत्या. पण ते माझ्या नशीबांत नाहीं. त्याला काय उपाय !

( कुसुम कागद घेऊन येते. )

मदन—( तो कागद घेऊन त्यांतला आंतील बंद केलेला कागद काढतो ) कुसुम! ह्यांत काय लिहिलं आहे हें तुझ्यापासून लपून रहावं असा कांहीं बाबांचा उद्देश नाहीं, त्याअर्थीं मी हा तुला कळवूनच वाचतो. ( वाचूं लागतो. ) ( थोडा वांचून झाल्यावर ) कुसुम ! बाबांनीं ह्यांत आपलं सर्व पूर्वीपासूनचें वृत्त लिहिलें आहे. ( पुन्हः थोडें वांचून ) अरेरे, काय हे, बाबांनीं केलं हें खरोखर चांगलं केलं नाहीं, हें फारच भयंकर ! ( सर्वंच वांचून झाल्यावर ) पण त्यांना त्याबद्दल शेवटीं पूर्ण पश्चात्ताप झालासा दिसतो. आणि आपल्या हांतून झालेली चूक त्यांनीं तशीच राहूं दिली नाहीं, हें बरें झालें. अरेरे बाबांचा जन्म सर्व अशा तऱ्हेनें दुःखांतच गेलाना ?

( खिन्न होतो. )

कुसुम— मदन ! काय असं खिन्न होण्यासारखं आहे त्यांत ?

मदन— ( तें पत्र तिला देऊन ) वाच, तूं तें सर्वंच वाच ह्मणजे तुला चांगलें समजेल.

( कुसुम तें पत्र वाचतें ).

**कुसुम**— ( वांचून झाल्यावर ) गरीब बिचारे, परमेश्वरा असा प्रसंग कुणावरही येऊं देऊं नकोस.

( सुस्कारा टाकते. )

**मदन**— झाल्या गोष्टीबद्दल आनंद मानावा कीं शोक करावा हेंच मला समजत नाहीं. ( थांबून ) पण नाहीं. मी असंच करणार. कुसुम! ह्यांत लिहिल्याप्रमाणें ही सर्व संपत्ती मनोरमाबाईची आहे, हें उघड होतें आतां आपल्या जन्मभर बाबांनीं जरी तसें केलें नाहीं तरी हा दुसऱ्याचा पैसा मला मुळींच नको. कुसुम यांतली एक पैसुद्धां मी घेणार नाही.

**कुसुम**— पण मृत्युपत्रांत लिहिल्याप्रमाणें तुझा तर सर्व पैशावर हक्क आहे, मग तुला कसली भीति !

**मदन**— भीति कसली. माझा हक्क आहे ह्मणूनच ती मी आपल्या ताब्यांत घेऊन त्यांना देऊन टाकणार. बाबांच्या हांतून त्यांचे नुकसान झालें तितकें पुरें आहे. मी तरी तें तसें होऊं देणार नाहीं. मी वाटेल तिथें मिळवून खाईन. खरोखर, बाबानीं ही संपत्ती माझ्या स्वाधीन केली हें फार चागलें झालें. नाहीतर गुलाबच्या हातांत गेली असती तर तिचा आणखीही दुरुपयोग झाला असता. कुसुम! हें वांचल्यापासून माझ्या जिवाला फार अस्वस्थता उत्पन्न झाली आहे. मी आतां शिरक्यांच्या इकडे जातो व त्यांची सर्व संपत्ती त्यांच्या स्वाधीन करतों त्याशिवाय मला चैन पडणार नाहीं.

( एक नोकर प्रवेश करतो. )

**नोकर**— धनीसाहेब शिरक्यांकडची सर्व मंडळी आपल्या भेटीला आली आहे. आज्ञा झाल्यास त्यांना आंत पाठवितों.

मदन— वः फारच चांगलें झालें. जा, त्यांना आंत पाठवून दे.

( गडी जातो. इतक्यांत मनोरमाबाई, मालती, वसंतराव अणि दौलतराव प्रवेश करतात. )

मदन— ( त्यांचें स्वागत करून ) यावं, आपल्याच भेटीची मी इतक्यांत इच्छा करीत होतों तों सर्वच अगदीं वेळेवर आलांत.

वसंत— पण मदन! हें काय, आपला चेहरा ह्या आनंददायक गोष्टीनें चांगला प्रसन्न असला पाहिजे होता. तो त्यावर अजून खिन्नता दृष्टीस पडते याचें कारण काय बरं ! आतां तर सर्व मनाप्रमाणें झालें.

मदन— अजून नाहीं झालं, पण मी लवकरच मनाप्रमाणें घडवून आणणार. हें वाचा. आपणापासून लपविण्यासारखं यांत कांहीं नाहीं.

वसंत— ( तें पत्र वांचून ) खरोखर, ही त्यांच्या हातून मोठीच चूक झाली.

मदन— पण मी ती भरून काढणार आहे. ही सर्व संपत्ती मनोरमाबाई तुमची आहे. खरं पाहिलं असतां यांतल्या एका पैवर सुद्धां माझा हक्क पोंचत नाहीं. बाबांनीं माझ्या नांवांनीं केलेलं मृत्युपत्र अगदीं खोटं आहे. मी त्याप्रमाणें कधींही करणार नाहीं.

मनोरमा— ती गोष्ट आतां होऊन गेली, त्याबद्दल तुह्मी काय करणार ?

मदन— काय करणार ह्मणजे जें तुमचें आहे तें तुमच्या स्वाधीन करणार. मी आपला कुठेंही मिळवून खाईन. मला यांतलं कांहींएक नको.

मनोरमा—मला वाटलंच होतं कीं, तूं असं करशील ह्मणून. कारण तुझा स्वभावच तसा उदार आहे, पण तसं करणं मुळीं माझ्याच मनांत नाहीं. मदन! झाल्या गोष्टी त्या सर्व ठीक झाल्या. आतां मी सांगतें त्याप्रमाणें सर्व व्यवस्था करून आपण सर्वजण आनंदांत राहूं.

मदन—ह्मणजे काय करणार ?

मनोरमा—मालतीचा तूं अंगिकार केलास, ह्मणजे यांतली अर्धी संपत्ती मीं तुलाच खुशीनें देतें; त्यावर तुह्माला आनंदांत राहतां येईल.

मदन—मनोरमाबाई! आमच्याकडून जो तुमचा महान अपराध झाला आहे, तो मला फारच जाणवतो. मालती मला माझ्या प्राणाहून प्रिय खरी, पण अशा स्थितींत तिची मीं तुह्माजवळ मागणी करावी ह्मणजे तुह्मालाच काय वाटेल! मला तर प्रशस्त दिसत नाहीं.

मनोरमा—मदन! हें तुझें ह्मणणें व्यर्थ आहे. तो अपराध कांहीं तुझा नाहीं, तेव्हां त्याबद्दल तुला व्यर्थ वाईट वाटून घेण्यांत काय अर्थ ! शिवाय, मी ह्मणतें त्याप्रमाणें झाल्यास खरोखर आपणां दोघांनाही आनंद होणार आहे.

मदन—असं असेल, तर माझी कांहीं ना नाहीं. पूर्वीपासूनच मी आपल्या ह्मणण्याच्या बाहेर नाहीं.

मनोरमा —आणि यापुढेंही तसंच राहून माझ्या मनाला आनंद द्यावात. ( मालतीचा हात मदनच्या हातांत देऊन ) मदन! आजपासून मालती तुझी झाली. सुखासमाधानानें दिवस घालवा. तुझ्यासारख्या सूज्ञ मनुष्याला हें सांगणें नकोच.

मदन—( आनंदानें ) त्याबद्दल तुह्मी कांहीं एक काळजी

करूं नका. परमेश्वर कृपेनें आज सर्वच मनाजोगें घडून आलें आहे. दौलतरावनीं व वसंतरावनीं माझ्याकरतां जे श्रम घेतले, त्यायोगें झालेल्या उपकारांची फेड माझ्या हातुन कधींही होणार नाहीं; पण अल्प तरी व्हावी ह्या उद्देशानें मला मिळणाऱ्या संपत्तींतून दहा हजारांचा ऐवज मी दौलतरावना देतों. खरं पाहिलं असतां हें कांहींच नव्हे, पण माझ्याकडे पाहून ते ह्याचा स्वीकार करतील अशी मला फार आशा आहे.

दौलत०— मदन! वसंतराव, तसंच मनोरमाबाई! मी जं हें तुमच्याकरता केलं हें मी कांहींच केलं नाहीं असं मला वाटतं. माझें कर्तव्य मी बजावलें, यांत जास्त काय झालें, आणि त्याबद्दलची फेड ती काय तुह्माला करायची?

मनोरमा— वः असं कसं ह्मणता दौलतराव. आजच्या आनंदाचें श्रेय सर्व तुमच्याकडेसच आहे. केवळ तुमच्यामुळेंच आज हा आह्माला सुखाचा दिवस दिसला, तव्हां केलेल्या विनंतीचा आपण अनादर करूं नये.

दौलत०— तुह्मी असं ह्मणतां तिथें उपाय नाहीं. ठीक आहे. तुमचेंही मन मोडणें चांगलें नव्हे.

मदन— हें पाहून मला फार आनंद होतो. (वसंताकडे वळून) वसंतराव (कुसुमचा हात त्याच्या हातांत घालून) ह्या माझ्या अल्पस्वल्प दिलेल्या देणगीचा आपण स्वीकार कराल याबद्दल मला संशय नाहीं.

वसंत—आणखी जास्त तें मला काय पाहिजे होतें.

मनोरमा—खरोखर आतां सर्वच मनाजोगें झालें.

मदन—त्या जगन्नियंत्याची पूर्ण कृपा असल्यावर काय होणार नाहीं. सर्वच गोष्टी परमेश्वरकृपेनें परिपूर्ण झाल्या.

मनोरमा—सज्जनाचा पाठीराखा ईश्वर असतो ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. अशीच दीनजनांवर तत्कृपेची वृष्टी असावी हें मी मनापासून इच्छितें.

( पडदा पडतो. )

